

प्रधान मंत्री भवन
PRIME MINISTER'S HOUSE
NEW DELHI

जुलाई २१, १९६५

लाला लाजपत राय जी हमारे देश के निर्माण करने वालों में से एक थे। वह उन थोड़े से इने गिने नेताओं में थे जिन्होंने अपने जीवन के प्रारम्भ से ही देश के लिये अपने को समर्पित किया। उनमें अनेक गुण थे। उनकी वाणी में बल था और उनके व्याख्यान सदा ओजपूर्ण होते थे। उनके भाषण और लेख तथ्य और भाव दोनों दृष्टियों से बड़े गम्भीर और प्रभावशाली होते। मुझे प्रसन्नता है कि महाराष्ट्र राज्य लाजपतराय शताब्दी समिति ने उनके भाषणों के प्रकाशन का निश्चय किया है। विश्वास है यह पुस्तक संसद, विधान सभाओं तथा स्वायत्त संस्थाओं के सदस्यों के लिये विशेष रूप से उपयोगी होगी।

लाल बहादुर

(लाल बहादुर)

# प्रस्तावना

स्व. लाला लाजपतराय यानी मध्यवर्ती कायदेमंडळात इ. स. १९२६ ते १९२८ पर्यंत केलेल्या भाषणाच्या ह्या पहिल्या खंडाला प्रस्तावना लिहिण्याची संधि लाभणे, हे मी माझे स्वतःचे भाग्यच मानतो. महाराष्ट्र राज्य लाला लाजपतराय जन्मशताब्दि महोत्सव समितितर्फे हा खंड प्रकाशित होत आहे. लालाजींचे व्यक्तिमत्व चतुरस्त्र व चौरस होते. लेखक, पत्रकार, राजकीय कार्यकर्ता, समाज सेवक, पट्टीचे संसदीय वाक्पटु वगैरे अनेक मार्गांनी त्यानी आपल्या मातृभूला परकीयाच्या दास्यातून मुक्त करण्यासाठी खटपट केली. आपल्या देशबांधवाना भारताच्या स्वातंत्र्य लढ्यात भाग घेण्यासाठी उद्युक्त करावे ह्याच एका हेतूने त्यानी आपल्या बुद्धि चापल्याचा नेहमी वापर केला. तातडीने जे प्रश्न सोडविण्याची आवश्यकता असेल त्या प्रश्नाकडे जनतेचे लक्ष वेधून घेण्याची खास खुबी त्याना साधली होती. ह्यासाठी वृत्तपत्रीय लिखाण, ग्रंथलेखन, सभा, ज्या मध्यवर्ती कायदेमंडळाचे काही काळ ते सदस्य होते त्या कायदेमंडळातील चर्चा वगैरे अनेक माध्यमाचा ते कौशल्यपूर्ण उपयोग करुन घेत असत.

संसदीय चर्चा व वादविवाद विषयक क्षेत्रात लालाजींच्या संसदीय भाषणानी अमोल भर घातली आहे. आजच्या व उद्याच्या संसद सदस्यानी लालाजींची ही भाषणे आदर्श म्हणून पुढे ठेवावयाला हरकत नाही. मध्यवर्ती कायदेमंडळातील लालाजींची भाषणे खंडरूपाने प्रसिद्ध करण्यामागे महाराष्ट्र राज्य लाला लाजपतराय जन्मशताब्दि महोत्सव समितीचाहि नेमका हाच हेतू असावा असे वाटते. ह्या खंडात देण्यात आलेली राजकीय भाषणे, लालाजींच्या वक्तृत्वाचा उच्च दर्जा व ज्ञानाचा व्यापक परीघ दाखविण्यास व संसदीय शिष्टाचाराचा त्यानी केलेला सूक्ष्म अभ्यास पटवून देण्याइतपत समर्थ आहेत. ह्या भाषणातून त्यानी ब्रिटिश सरकारवर सडेतोड व उपहासगर्भ टीका केलेली असली तरी अभिरूचीची उच्च पातळी त्यानी क्वचीच सोडलेली नव्हती.

प्रसिद्ध करण्यात येणारी ही ग्रंथमाला आपला अपेक्षित हेतु साध्य करील असा विश्वास वाटतो.

**स. का. पाटील,**

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य लाला लाजपतराय शताब्दि समिति

# निवेदन

पंजाब केसरी लाला लाजपतराय त्या काळचे केवळ एक थोर क्रांतिकारकच होते असें नाही तर एक महान ससदीय नेतेही होते. जिला त्यावेळी केंद्रीय धारासभा असे म्हटले जात असे अशा त्यावेळच्या केंद्रीय विधान सभेचे सदस्य म्हणून ते १९२६ साली नॅशनॅलिस्ट पक्षातर्फे निवडून आले होते आणि १९२८ साली त्याचा मृत्यू होईपर्यंत ते तिचे सदस्य होते.

त्या केंद्रीय विधानसभेत नॅशनॅलिस्ट पक्षातर्फे २० सदस्य निवडून आले होते. त्या पक्षाचे पंडित मदन मोहन मालवीय नेते व लाला लाजपतराय उपनेते होते. त्याचप्रमाणें विधानसभेत ४० सदस्य असलेल्या स्वराज्य पक्षाचे पंडित मोतीलाल नेहरू नेते होते व श्री. श्रीनिवास अय्यंगार हे उपनेते होते. १७ स्वतंत्र सदस्याचा आणखी एक गट होता आणि श्री. महमदअली जिना हे त्याचे नेते होते. त्या शिवाय कोणत्याही गटात नसणारे काही सदस्य होते आणि काही मुस्लिम सेंट्रल पक्षाचेही होते. त्याची संख्या १७ होती. नियुक्त केलेल्या सदस्याची संख्या सरकारी २६ व इतर १५ मिळून ४१ होती अर्थ सदस्य सर बेलिस ब्लॅकेट हे त्याचे नेते होते. त्या काळात १९२१ ते १९२६ पर्यंत लॉर्ड रीडिंग आणि त्यानतर १९३१ पर्यंत लॉर्ड आर्यविन भारताचे व्हॉइसरॉय होते.

श्री. विठ्ठलभाई पटेल हे त्या विधानसभेचे अध्यक्ष म्हणून निवडून आले होते. प्रथम चार महिने लाला लाजपतराय स्वराज्य पक्षात होते पण पुढें नॅशनॅलिस्ट पक्षात सामील झाले केंद्रीय विधान सभेत लालाजी अत्यंत प्रभावीपणें भारतीय दृष्टिकोण माडीत असत त्याच्या विधान सभेतील भाषणाची सामान्यत. राजनैतिक, सामाजिक आणि आर्थिक अशा तीन वर्गात विभागणी करता येईल.

लालाजींच्या अंगी अद्‌भुत वक्तृत्व शक्ति होती. त्याची भाषणें मार्मिक आणि प्रभावशाली होत असत. विधानसभेत निरोगी आणि रचनात्मक विरोधी उच्च परपरा निर्माण करणारामध्यें लालाजींचे स्थान श्रेष्ठ आहे. कठोर विरोधाच्या वातावरणातही ते धैर्य सोडीत नमत. अत्यंत संयमपूर्वक आणि नम्रतेनें सरकारवर अत्यत कठोर आणि मर्माघाती टीका करण्यात ते निष्णात होते. तो

त्याचा एक विशेष गुण होता त्याची ती भाषणें आजही आपणाला ससदीय व लोकशाही पद्धती अनुसरताना मार्गदर्शक ठरतील

भारतात लोकशाहीच्या आणि ससदीय शासन पद्धति अधिक सुदृढ करण्याची आज फार आवश्यकता आहे केंद्रीय विधानसभेंत लालाजींनी केलेली भाषणें निरोगी ससदीय परपरा आणि आचरण या बाबतीत उत्कृष्ट उदाहरण आहे यादृष्टीनें लालाजींची भाषणे आपणाला मार्गदर्शक ठरतील, असा महाराष्ट्र राज्य लाला लाजपतराय शताब्दि समितीला विश्वास वाटतो ही गोष्ट लक्षात घेऊनच समितीने ही भाषणे पुस्तक रूपाने प्रकाशित करण्याचा निर्णय घेतला

केंद्रीय विधानसभेंत लालाजींनी केलेल्या काही राजनैतिक महत्त्वाच्या भाषणाचा समावेश या पहिल्या पुस्तकात करण्यात आला आहे ज्या उद्देशानें हें पुस्तक प्रकाशित करण्यात आलें आहे तो उद्देश निश्चित सफल होईल अशी केवळ आशा आहे एवढेंच नसून तसा विश्वास वाटतो

या पुस्तकाच्या प्रकाशनकार्यात महाराष्ट्र विधान परिषदेचे अध्यक्ष **श्री. विठ्ठल स पागे** व विधान सभेचे अध्यक्ष **श्री. त्रिबक शिवराम भारदे** याचे मार्गदर्शन समितीला लाभले आहे त्याबद्दल समिती त्याची सदैव ऋणि आहे लालाजींच्या मूळ इग्रजी भाषणाचा मराठी अनुवाद करण्यात आणि पुस्तक प्रकाशनाच्या कामात **श्री. भगवत व्य देशपाडे** यानी समितीला पूर्णपणें सहाय्य केले आहे त्याबद्दल समिती त्याची आभारी आहे त्याचप्रमाणें अत्यत थोडया अवधीत आणि पुष्कळ अडचणी असतानाही इतक्या उत्तम रीतीनें हें पुस्तक छापून दिल्याबद्दल वेंकटेश्वर प्रेसचे मालक **श्री मुरलीधर बजाज** याचीही समिती अत्यत आभारी आहे वेस्ट कोस्ट पेपर मिल्स लि यानी या पुस्तकाकरिता देणगी म्हणून कागद पुरविला आहे, त्याचीही समिती आभारी आहे

**डॉ अेन् अेन् कैलास,**

अध्यक्ष, पुस्तक प्रकाशन उपसमिति,

महाराष्ट्र राज्य लाला लाजपतराय शताब्दि महोत्सव



''कष्ट सोसण्याची लोकाची तयारी असल्याशिवाय प्रगति होऊ शकत नाहीं.''

—लाला लाजपत राय

# अनुक्रमणिका

[भारतीय जनता स्वराज्य स्वीकारण्यास लायक झाली आहे किंवा नाही याची पाहणी करण्याकरता १९२८ साली ब्रिटिश सरकारने पार्लमेंटच्या सभासदाचे एक सांविधिक (Statutory) कमिशन भारतात पाठवले होते. त्याचे प्रमुख सर जॉन सायमन हे होते, म्हणून ते कमिशन सायमन कमिशन म्हणून प्रसिद्ध झाले.

३० ऑक्टोबर १९२८ रोजी ते कमिशन लाहोर येथें पोहोचताच लाला लाजपतराय याच्या नेतृत्वाखाली लाहोर स्थानकावाहेर त्याच्या विरुद्ध जोरदार निदर्शन करण्यात आले. पोलिसानी निदर्शकावर लाठीमार केला. लालाजीना लाठीमारात जबर जखमा झाल्या. त्याचाच परिणाम म्हणून १७ नोव्हेंबरला त्याचे देहावसान झाले

ज्या सायमन कमिशनला विरोध करीत असताना लालाजींनी आपले बलिदान दिले त्याला त्या वेळच्या केंद्रीय विधानसभेत त्यानी कडाडून विरोध केला होता. लाठीहल्ल्याच्या काही महिने अगोदर १६ फेब्रुवारी १९२८ रोजीं केंद्रीय विधानसभेत त्यानी एक ऐतिहासिक ठराव माडला होता; तो असा :

"ही सभा गव्हर्नरजनरल इन कौन्सिल यांना अशी शिफारस करीत आहे कीं, सांविधिक कमिशनची सध्याची घटना आणि योजना या सभागृहाला पूर्णपणे अमान्य असून त्याच्याशीं हें सभागृह कोणत्याही वेळी आणि कोणत्याही प्रकारें कसलाही संबंध ठवणार नाहीं असे त्यांनी बादशहांच्या सरकारला कळवावे. "

या प्रस्तावाला प. मोतीलाल नेहरू, पं. मदनमोहन मालवीय, श्री. महम्मद अली जीना, श्री. मा. श्री अणे, श्री. न चि. केळकर, पं. हृदयनाथ कुंझरू, राजा गझनफरअल्ली, बॅ. एम्. आर्. जयकर, श्री. श्रीनिवास अय्यंगार, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास आणि श्री. घनश्यामदास बिर्ला यांनी जोरदार पाठिंबा दिला

वडाक्याच्या चर्चेनंतर ६२ विरुद्ध ६८ मतानी हा ठराव समत झाल्याचे विधानसभेचे अध्यक्ष श्री. विठ्ठलभाई पटेल यानी जाहीर करताच सर्व सभागृह 'वदेमातरम'च्या घोषणेने दुमदुमून गेले ]

## ठरावाचा हेतु

अध्यक्ष महाशय, माझ्या नावावर असलेला हा ठराव माझ्यावर सार्वजनिक कार्यकर्ता म्हणून पडलेल्या या मोठ्यात मोठ्या जबाबदारीची पूर्ण जाणीव ठेवून मी माडीत आहे सुरवातीलाच थोडक्यात आणि स्पष्टपणें तसें करण्यातील माझा हेतु मी सागतो हा ठराव माडण्याचे पहिलें कारण असें की, हे कमिशन नेमण्याच्या बाबतीतील सरकारच्या किंवा ते नेमणाऱ्याच्या प्रामाणिकपणावर माझा विश्वास नाही माझा तसा विश्वास का नाही तें मी नतर सागतो दुसरे कारण म्हणजे या नेमलेल्या कमिशनच्या पात्रतेवर माझा विश्वास नाही अध्यक्ष महाशय, सर जॉन सायमन हे ब्रिटिश राष्ट्रातील काही थोड्या सामर्थ्यवान लोकांपैकी एक आहेत हे मला मान्य आहे, आणि कमिशनच्या सभासदाच्या सद्हेतुबद्दल माझा त्याच्यावर संपूर्ण विश्वास आहे परतु हा देश, येथील राजकारण आणि इतिहास याबद्दलचे त्याचे अज्ञान लक्षात घेऊनच त्याची नियुक्ति करण्यात आली आहे, आणि माझ्या मते त्याच्यावर सोपविलेले काम करण्याबद्दलची त्याची अपात्रता दाखविण्याचे हेच सर्वांत मोठे कारण म्हणून सागता येईल भारतासमोर असलेले प्रश्न इतके मोठे आणि गुतागुतीचे आहेत की, जरी स्वर्गातून प्रत्यक्ष देव खाली उतरले तरीहि कमिशनला देण्यात आलेल्या काल-

मर्यादेत हे काम पुरे करावयाचे म्हटले तर ते त्यानाही शक्य होणार नाही. इतक्या थोड्या कालावधीत भारत आणि इंग्लड या दोघांनाही मान्य होण्यासारख्या समाधानकारक शिफारशी कमिशनच्या सभासदाना करता येतील असें वाटत नाही. माझें तर असें मत आहे की, हे कमिशन येथील नोकरशाही जे सागेल ते सर्व ग्रामोफोनप्रमाणें ध्वनिमुद्रित करील आणि इंग्लडमध्यें परत गेल्यावर तेथील दुसऱ्या कोणाच्या सल्ल्यानुसार आपल्या शिफारशी तशाच तऱ्हेनें पुन्हा तयार करील. आत्ताच ज्या गुप्त रीतीनें त्यानी आपल्या कामास सुरुवात केली आहे त्यावरून या गोष्टीचे प्रत्यंतर येईल. लोकाशी संबंध ठेवून त्याना आपल्या कार्यक्रमाबद्दल माहिती देण्याची त्याना अतिशय भीति वाटत आहे. गुप्त आणि रहस्यमय रीतीनें ते ठिकठिकाणी भेटी देतात, यावरूनच हे लक्षात येईल की, त्याना मार्गदर्शन करणारे लोक आपणास त्याच्यापुढें ज्या गोष्टी माडणे योग्य वाटते त्याच माडण्याचे पसंत करतील.

## इंग्लंड व भारत यांचे संबंध

हा ठराव माडण्याचे तिसरे कारण असे की, भारताचा प्रश्न कोणतेहि कमिशन सोडवू शकेल असे मला वाटत नाही. ज्या गोष्टी अस्पष्ट आणि वादग्रस्त असतात त्याच्याबद्दल सत्य परिस्थितीची चौकशी करण्याकरता कमिशनें नेमली तर ते मी समजू शकतो परंतु कोणतेही राष्ट्र स्वतःचे राज्य चालविण्यास समर्थ आहे किंवा नाही आणि त्याच्या हितसंरक्षणाकरता कशा तऱ्हेची राज्यघटना असावी हें ठरविण्याच्या कामी कोणतेहि कमिशन पात्र आहे असे मला वाटत नाही. ( बिनसरकारी सभासदाकडून मान्यतेचा आवाज. ) हिंदुस्थानचा प्रश्न कमिशनकडे सोपविण्यासारखा नाही असे मला वाटते, तो इंग्लड आणि भारत याच्या प्रतिनिधीनी सलोख्याच्या वातावरणात वाटाघाटीनी सोडविला पाहिजे ('होय, होय' असा आवाज ) तसें केल्यानेच याबाबतीत एकमत होईल आणि नतर पार्लमेंटमध्यें ते समत होईल.

अध्यक्ष महाशय, या बाजूच्या सदस्यांनी अशा तऱ्हेचे मत मांडल्यामुळे आमच्या पार्लमेंटविषयी असलेल्या दृष्टिकोणाबद्दल बराच गैरसमज पसरला आहे आम्हाला वस्तुस्थितीचे आकलन झाले नाही आणि भारताचे भवितव्य ठरविण्याचा प्राथमिक आणि अंतिम निर्णय फक्त पार्लमेंटच घेऊ शकेल, हे आम्ही लक्षात घेतले नाही असे सांगितले गेले अध्यक्ष महाशय, त्या बाबतीत अंतिम जबाबदारी पार्लमेंटची आहे, पण प्राथमिक जबाबदारी त्याच्यावर नाही, हा सिद्धांत मला मान्य नाही माझ्या कल्पनेप्रमाणे या सभागृहातील या बाजूच्या लोकांनी पार्लमेंटला हुकूम सोडण्याची आमची इच्छा आहे असे कधीहि म्हटले नाही आम्ही फक्त एवढेच म्हटले की, हा प्रश्न दोन्ही देशांचे हित लक्षात घेऊन सलोख्याच्या आणि समजुतीच्या वातावरणात सोडविला पाहिजे, आणि केवळ याच तत्त्वावर दोन्ही बाजूंचे एकमत होऊ शकेल आणि परस्परांची मान्यता मिळाल्यावर मग पार्लमेंट 'आपोआपच' त्याला मान्यता देईल. मी 'आपोआप' हा शब्द मुद्दाम योजिला आहे, कारण पार्लमेंट सरकारला पाहिजे असेल तेच वेळोवेळी करीत असते पार्लमेंटच्या यंत्रणेचे सरकार प्रतिनिधित्व करीत असते आणि म्हणून एका दृष्टीने वेळोवेळी सरकारचा कारभार चालविण्याच्या आणि त्याचे निर्णय जाहीर करण्याच्या यंत्रणेचेच काम पार्लमेंट करीत असते भारताच्या प्रतिनिधींशी जर सरकारने एखादा करार कधी केला तर पार्लमेंट आपोआपच तो करार मंजूर करील आणि तशी उपाययोजना करील राज्यघटना तयार करण्याचे काम आमच्यावर सोपवा, आम्ही ती तयार केली म्हणजे पार्लमेंट नंतर ती मंजूर करील असे जे आम्ही म्हणत आहोत त्याचा आशय हाच आहे

## कमिशनची अपात्रता

अध्यक्ष महाशय, आमची मूळ भूमिका मांडण्यात विषद केल्यावर मी आता भारतमंत्र्यांनी अशा तऱ्हेचे कमिशन नेमण्याबद्दल जे मुद्दे दिले आहेत त्याकडे

वळनी त्यानी बऱ्याच गोष्टीचा उल्लेख केला आहे या बाबतीत निर्णय घेण्याचे काम पार्लमेंटचे आणि एकमेव पार्लमेंटचेच आहे असें त्यानी एके ठिकाणी म्हटले आहे त्याचे म्हणणे असे आहे की, ईस्ट इडिया कपनीकडून पार्लमेंटने या देशाचा राज्यकारभार आपल्याकडे घेतला व हिंदुस्थानला अराजकतेच्या अदाधुदीपासून वाचविले, आणि आज जरी ब्रिटिश लोक हा देश सोडून गेले तरीही येथे अराजक आणि अदाधुदी माजल्यावाचून राहणार नाही दुर्दैवाने अराजकासबधीच्या भारतमत्र्याच्या आणि आमच्या कल्पनेमध्ये फारच फरक आहे भारताशी इग्लडच्या असलेल्या सबधाचा त्यानी गौरवास्पद व थोर असा उल्लेख केला आहे होय, इग्लडच्या दृष्टीने हा सबध थोर व गौरवास्पद आहे, पण भारताच्या दृष्टीने तो दुर्लौकिकाचा आणि काळिमा लावणारा आहे इग्लडच्या भारताशी आलेल्या सबधामुळे आमचा सागण्यासारखा काही फायदा झाला आहे असे मला वाटत नाही आमच्या आणि भारत मत्र्याच्या दृष्टिकोणात हा महत्त्वाचा फरक आहे

## अराजकाची भीति नको

पुढे अराजकाच्या अदाधुदीबद्दल त्यानी सागितले आहे **परकीयानी सगिनी रोखून कायद्याच्या जोरावर जे अराजक येथे माजविले आहे त्यापेक्षा कोणतेहि अराजक मोठे असू शकणार नाही** कोणत्याही स्वाभिमानी देशावर त्यापेक्षा अधिक अदाधुदी लादता येणार नाही ज्याच्याकरिता सरकार बनविण्यात येते त्याना आपले भवितव्य ठरविण्याचा अधिकार नाकारणे यापेक्षा मोठी अदाधुदी कोणती असू शकेल? कोणतीच असू शकणार नाही कोणत्याही अराजकानतर सुव्यवस्थित आणि प्रस्थापित सरकारचा कारभार सुरू होत असतो अध्यक्ष महाशय, दमदाटीमुळे कसलीच प्रगती होऊ शकत नाही अराजकाच्या या दमदाटीमुळे आम्ही भेदरून जाणार नाही या सभागृहाचा सभासद या नात्याने मला असें सागावेसे वाटते की, या देशातून ब्रिटिश निघून

गेल्यामुळें जरी अराजक माजलें तरी मला त्याची मुळीच भीति वाटत नाही वाईटात वाईट गोष्ट घडली तरी त्याला माझी तयारी आहे हल्ली ज्या अवस्थेत आम्ही राहात आहोत त्यापेक्षा आणखी वाईट काय असू शकेल ? यापेक्षा वाईट काहीच असू शकणार नाही विपत्ती आणि मानहानि याच्या अगदी शेवटच्या पातळीला आम्ही पोहोचलो आहोत यापेक्षा कमीपणाची कोणतीहि गोष्ट असणार नाही जर ब्रिटिश सरकारला त्याच्या येथून निघून जाण्यामुळें आम्ही येथे परस्परात लढाया करू असे वाटत असेल तर मी तेही मान्य करीन. कारण काही वर्षें आपसात लढून रक्त साडल्यानतर आम्ही अखेर शात होऊ आणि कसे का होईना सरकार स्थापन करू पण तें आमचेच असेल आणि कालातराने आम्ही त्यात सुधारणाही घडवून आणू ( युरोपियन बिनसरकारी सभासदाच्या बाजूने हसण्याचा आवाज ) युरोपियन सभासद माझ्या बोलण्याला हसत आहेत त्याना माझें असें उत्तर आहे की, तुम्ही मनमोकळ हसू शकता, कारण एखाद्या चित्रकाराला जसें स्वत च्या मनात येईल ते चितारण्याची मुभा असते त्याप्रमाणें तुम्हाला वागण्याचे स्वातत्र्य आहे आमच्या जागी तुम्ही असता तर तुम्हाला हसू आले नसतें, रडण्याची वेळ आली असती आम्हाला **फक्त दोन वर्षें इग्लंडवर राज्य करण्याची सत्ता द्या आणि मग पहा कोण हसते आणि कोण रडते तें !**

( श्री के. अहमद – मोगल साम्राज्याच्या काळात तुम्ही कसे राज्य केलें ? इग्रज लोक येथें कसे आले ? हिंदु-मुसलमानाच्या दग्याबद्दल काय ? )

आम्ही फार उत्तम कारभार केला हिंदु-मुस्लिम दग्याची मला काळजी वाटत नाही इग्लडमध्यें सुद्धा दगे झाल्याचे आपणास ऐकू येत नाही काय ? ज्यावेळी हा प्रश्न आम्हालाच सोडवावयाचा आहे ह आमच्या ध्यान येईल त्यावेळी तो आम्ही सोडवूच तिसऱ्या पक्षाच्या लुडबुडीमुळे दगे होतात. हे दगे घडवून आणणाऱ्या लोकाच्या मागे तिसऱ्या पक्षाचेच लोक असतात

एका जबाबदार मुत्सद्यानीच कोणताही तिसरा पक्ष मध्यें पडला नाही तर हिंदु व मुसलमान याच्यातील तंटे मिटविता येतील असे विधान केलेले नाही काय ? तुम्ही निघून जा आणि मग तटे होतात काय तें पहा. हीच सर्वात सोपी कसोटी आहे. अशा नुसत्या बोलण्याचा काही उपयोग नाही.

## कमिशनची भूमिका

*अध्यक्ष महाशय, भारत मंत्र्याच्या निवेदनातील दुसऱ्या भागाकडे* मी आता वळतो. ते म्हणतात की, हें कमिशन भारताला न्याय सभा ( Jury ) म्हणून जात आहे. न्यायसभेचा उच्चार करताच दोन पक्ष असावयास पाहिजेत हे उघड आहे. *मग आमचा पक्ष कोणता ? भारत मन्त्र्याच्या दृष्टीनें आम्ही बहुतेक आरो*पीच असणार. **स्वराज्य मिळविण्याची आमच्यात पात्रता आहे किंवा नाही याची चौकशी करण्याकरतां कमिशन आले आहे.** पूर्णपणें परकीय लोकाचा भरणा असलेल्या न्यायसभेने चौकशी केल्याचे तुम्ही कधी ऐकले आहे काय ? **निदान इंग्लंडमध्यें तरी कोणाचीहि न्यायालयीन चौकशी समान परिस्थितींतील न्यायाधिकाऱ्याकडूनच केली जावी हे तत्त्व सर्वमान्य आहे.** येथे ही न्यायसभा ब्रिटिश पार्लमेंटच्या सभासदांची बनली असून ते या देशावर राज्य करण्याच्या आमच्या पात्रतेचा विचार करणार आहेत. ही न्यायसभा आणि सामान्यपणे रूढ असलेली न्यायसभा यात कोणते साम्य आहे ? ब्रिटिश पार्लमेंटच निर्णय घेणार आहे असें भारत मन्त्यानी आम्हाला सागितले आहे. हे पार्लमेंटचेच सभासद आहेत. याचा अर्थ असा होतो की, जे न्यायमंडळ आमच्या बाबतीत विचार करून निर्णय देणार आहे त्या मडळाचाच हे कमिशन हा एक भाग आहे. न्यायाधीश आणि न्यायसभा ( Jury ) या दोन्हीच्या कार्याचे एकीकरण त्याच्यात झालें आहे. न्यायदानाची अशीच कल्पना इंग्लंडमध्ये प्रचलित आहे काय ? न्यायसभेबद्दलचे हे बोलणें म्हणजे केवळ मूर्खपणाची वटवट आहे

त्यापुढें, हे कमिशन भारतात वार्ताहर म्हणून जात आहे असे भारत मंत्री म्हणतात न्यायसभेने वार्ताहराचे काम केल्याचे आपण कधी ऐकले आहे काय ? न्यायसभा बातम्या देत नाहीत, त्या निर्णय देतात ते पुढें म्हणतात की, १९१९ च्या कायद्यात राज्यघटना ठरवून देण्यात आली आहे, आणि राज्यघटनेचे एक व्यासंगी वकील या नात्याने त्याना असे वाटतें की, फक्त याच मार्गाचा उपयोग करणे त्याना शक्य होते त्या कायद्यात पार्लमेंटच्या कमिशनसंबंधी सुचविण्यात आले आहे लॉर्ड बर्कनहेड अत्यंत बुद्धिमान आणि कार्यक्षम असतील, परंतु जगाच्या इतर भागातही बुद्धिमान आणि कार्यक्षम व्यक्तींचा तुटवडा नाही ते अत्यंत बुद्धिमान असतील आणि भारत मंत्री म्हणून त्याच्या शब्दाला मान असेल परंतु लॉर्ड बर्कनहेड याच्या इतकेच बुद्धिमान आणि राज्यघटनेचे त्याच्या इतकेच व्यासंगी वकील भारतातही आहेत (एक सभासद–त्याच्याहून अधिक.) होय. कदाचित् त्याच्यापेक्षा अधिक म्हणून लॉर्ड बर्कनहेड यानी पार्लमेंटच्या ज्येष्ठ सभागृहात राज्यघटनेच्या कायद्यासंबंधी या प्रश्नावर केलेलें विवेचन बरोबर आहे किंवा नाही हे ठरविण्याचे काम मी माझ्या कायदेपंडित मित्रा-वरच सोडतो. माझ्या मतें ते बरोबर नाही

## दलित वर्गाचे अस्तित्व

अध्यक्ष महाराज, त्यापुढे हे पूर्णपणें ब्रिटिश सभासद असलेले कमिशन नेम-ण्याच्या समर्थनार्थ लॉर्ड बर्कनहेड यानी आणखी काही मुद्दे सांगितले आहेत. त्याच्या एका मुद्यात दलित वर्गाच्या लोकाबद्दल फार कळकळ व्यक्त करण्यात आली आहे हे दलित वर्ग केव्हापासून अस्तित्वात आले ? त्याच्या अस्तित्वाची जाणीव ब्रिटिश सरकारला केव्हापासून झाली ? त्याच्या दृष्टीने त्याचे अस्तित्व १९१७ सालापासून सुरू झालेले दिसते त्यापूर्वी त्याना अस्तित्व नव्हते

(एक सन्माननीय सभासद – ते कसे ?)

एक मिनिटभर थाबल्यास मी आपणास तेच दाखविणार आहे ब्रिटिश साम्राज्याच्या अंतर्गत राहून भारतीय लोकाना स्वत चे जबाबदार सरकार स्थापण्यास तयार करणे हे ब्रिटिशाच्या भारतविषयक धोरणाचे उद्दिष्ट राहील अशी महत्त्वाची घोषणा १९१७ च्या ऑगस्ट महिन्यात करण्यात आली. सरकारात असलेल्या इतर अँग्लो–इंडियन समाजाच्या लोकाना ही घोषणा आवडली नाही, म्हणून १९१७–१८ च्या शैक्षणिक प्रगतीच्या अहवालात प्रथमत दलित वर्गाचा उल्लेख केल्याचे आढळून आले *त्यापूर्वी इंग्रज सरकारच्या* **दृष्टीने त्याना मुळीच अस्तित्व नव्हते** मग सरकारने काय केले ? त्याने त्यावेळी दलित वर्गाच्या लोकानी शैक्षणिक दृष्टया कोणती प्रगति केली आहे आणि त्याच्या हिताच्या दृष्टीने काय करता येईल याचा विचार करण्याकरता दलित वर्गातील लोकाची शिरगणती करविली त्याची लोकसख्या त्या शिरगणतीप्रमाणे ३ कोटीच्या आसपास भरली १९२१ च्या शिरगणतीमध्ये शिरगणती कमिशनने हा आकडा ५ कोटी २० लक्षापर्यंत वाढविला आणि सर्वसामान्यपणे सर्व भारतात हा आकडा ५ कोटी ५० लक्ष ते ६ कोटीच्या मध्ये कोणतातरी असावा असे विधान त्यानी केले लेखणीच्या एका फटकाऱ्यात **मिस्टर फोटमन** यानी हा आकडा नक्की ६ कोटी इतका वाढविला आणि तसाच ६ कोटीचा उल्लेख ब्रिटिश राज्यकर्ते, टाईम्स आणि दलित वर्गाबद्दल नक्राश्रु ढाळणारे इतर लोक आता करीत आहेत यापूर्वी त्यानी त्याच्याकरता काय केले ? गेल्या १५० वर्षाच्या काळात ब्रिटिश सरकारने त्याच्याकरता काय केले आहे असे मी विचारतो

( **के अहमद** – तुम्ही काय केले ? )

## दलित वर्गाविषयींची कळकळ दांभिकपणाची

मी काय केले ते तुम्हाला सागतो गेल्या २५ वर्षाहून जास्त काल मी दलित वर्गाच्याकरता कार्य करीत आहे त्यानतर कितीतरी कालाने विधान मडळात

त्यांच्या प्रतिनिधीत्वाचा उल्लेख केला गेला. त्या २५ वर्षांत दलित वर्गाच्या शैक्षणिक प्रगतिबाबत आणि त्याच्या उन्नतिकरता सरकारच्या बाजूकडील सभासदापैकी कोणीहि काही केले असल्यास ते सांगावे असे मी त्याना आव्हान करतो आता सुद्धा या सत्तेखाली दलित वर्गांची शैक्षणिक आणि इतर प्रगति लवकर व्हावी म्हणून आम्ही जे काही थोडे प्रयत्न करतो त्यालाहि या सरकार-कडून सर्वत्र विरोध करण्यात येतो ज्यावेळी पंजाबात दलित वर्गाच्या लोकां-साठी सार्वजनिक विहिरी खुल्या करण्यात याव्यात अशी मागणी आम्ही केली तेव्हा त्यानी तसें करण्यास नकार दिला त्याच्या शिक्षणाकरता खास शिष्य-वृत्या ठेवाव्यात असे आम्ही सांगितले त्यावेळी त्यानी त्या गोष्टीला मान्यता दिली नाही. जेव्हा एका सभासदानी दलित वर्गाच्या शिक्षणासाठी ९ लाख रुपये मंजूर करण्यात यावेत अशी निश्चित सूचना केली त्यावेळी सरकारने तिला 'नाही' असे उत्तर दिलें. ज्यावेळी या वर्गाच्या लोकाना सैन्यात किंवा निदान पोलीस दलात वरच्या जागा देण्यात याव्यात अशी मागणी आम्ही केली त्यावेळी गृह सदस्यांनी उत्तर दिलें की, "नाही, सद्यःपरिस्थितीत आम्हाला तसें करता येणार नाही, कारण इतर हिंदु लोक त्याला विरोध करतील" मग दलित वर्गाविषयी वाटणारी ही कळकळ म्हणजे आहे तरी काय? हें सर्व दांभिक-पणाचे बोलणें आहे. गेल्या २५ वर्षांच्या इतिहासावरून ब्रिटिश सरकारनें दलित वर्गाकरिता काय केले असेल ते त्यानी मला दाखवावें असे आव्हान मी दलित वर्गातून आलेल्या खुद्द राजन यानाच करतो हा प्रकार फक्त डोळ्यात धूळ टाकण्यासारखाच आहे. **मानवतेच्या आणि नि:स्वार्थी दृष्टिकोणांतून आम्हीच प्रथम ही चळवळ सुरू केली.** ते आमच्यातील अविभाज्य घटक आहेत हें समजून गेली ५० वर्षें आम्ही आमच्या नम्र मार्गानें त्याची उन्नति करण्याचे प्रयत्न करीत आहोत माझ्या वेळातील आणि बचत केलेल्या पैशातील बराच भाग दलित वर्गीयाच्या हितासाठी मी खर्च केला आहे. सरकारने आणि जोरजोरानें बोलणाऱ्या बिनसरकारी युरोपियन लोकानी त्याच्या करता काय केलें आहे

असें मी विचारतो त्यानी काय केले आहे ते ते मला सागू शकतील काय? त्यानी या वर्गाच्या उन्नतिसाठी काहीही पैसा मजूर केला नाही त्याच्या उन्नतिसाठी त्या समाजात त्यानी आपले प्रतिनिधीही पाठविले नाहीत यावद्दल आणखी वोलण्याची माझी इच्छा नाही, अध्यक्ष महाशय

( श्री अब्दुल कय्युम -- हे दलित वर्ग कोणी निर्माण केले ? )

अध्यक्ष महाशय, दलित वर्गाच्या निर्मितीमागें मोठा इतिहास आहे (हास्य आणि मान्यतेचा आवाज ) इग्लडमधील कामगार वर्ग कोणी निर्माण केला असें मी विचारतो ? सयुक्त सस्थानातील निग्रो समाज कोणी निर्माण केला ? ज्याना युरोपातील शोपणकर्त्यानी जनावरापेक्षाही कमी दर्जाचे लेखले असे दक्षिण आफ्रिकेतील गुलाम कोणी तयार केले असे मी विचारतो दलित वर्गाविपयी वोलण्याचा आणि त्याचे हितकर्ते म्हणून मिरविण्याचा काय उपयोग? हे सर्व ढाग आहे ते पूर्णपणें दाभिकपणाचे आहे असे मला म्हणावयाचे आहे

अध्यक्ष महाशय, वादविवादाच्या आवेगात माझे मित्र श्री गोस्वामी यानी हिंदुसभेच्या प्रातिनिधिक स्वरुपावद्दल केलेल्या एका तुटक उल्लेखाचा गैर फायदा घेणें लॉर्ड बर्कनहेड याना अत्यत कमीपणा आणणारे आहे ब्रिटिश सरकार आणि ब्रिटिश मुत्सद्दी याच्या चारित्र्याची परीक्षा मजूरपक्षाच्या सभासदानी कनिष्ठ सभागृहामध्यें ( House of Commons ) त्याच्या विरुद्ध काढलेल्या उद्गारावरून आम्ही करावयाची काय? आम्ही जर त्याची परीक्षा तशी केली तर भारतमत्री किंवा पतप्रधान याच्या एका शब्दावरही आमचा कधीही विश्वास वसणार नाही कारण खोटारडे, दरोडेखोर आणि डाकू या शब्दात त्याचा दररोज धिक्कार होत असतो म्हणून लॉर्ड बर्कनहेड याना हे शोभण्यासारखे नाही असे मी म्हणतो. पण त्याना दुसऱ्या कोणत्याही मुद्याचा आधार घेता येण्याजोगा नसल्यामुळे

त्यानी बुडत्याने काडीचा आधार घ्यावा, त्याप्रमाणें श्री. गोस्वामी याच्या उद्गाराचा उपयोग केला पूर्णपणे ब्रिटिश सदस्य असलेल्या या कमिशनचे समर्थन करण्याकरता असें करणें अत्यत कमीपणाचे आहे

## सरकारचा हेतु प्रामाणिक नाही

अध्यक्ष महाशय, मला आपणास आणखी काही सागावयाचे आहे हे कमिशन नियुक्त करण्यामागील ब्रिटिश सरकारच्या सद्हेतुबद्दलच आम्हाला प्रथमत शका आहे असें मला का वाटतें ते मी आपणास सागणार आहे ज्या वेळी ऑगस्ट १९१७ ची ती प्रसिद्ध घोषणा करण्यात आली त्या वेळी मी सयुक्त सस्थानात होतो, त्यामुळें मला दोस्त राष्ट्राच्या त्यावेळच्या धोरणापाठीमागील विचाराची माहिती होण्याची सधि मिळाली मी पूर्ण जाणीवपूर्वक आणि जबाबदारपणें असे विधान करतो की, काही लोकानी म्हटल्याप्रमाणे १९१७ ची ती घोषणा घाईघाईने व उदारवृत्तीने करण्यात आलेली नव्हती माझ्यामते ती फक्त एक युद्धकालीन उपाययोजना होती फक्त युद्धाकालाकरताच ती होती आणि तिचा उद्देश आम्हाला थोड्या कालात स्वराज्य देण्याचा कधीही नव्हता ज्या मुत्सद्दी व्यक्तींनें ती घोषणा केली ती पूर्णपणे प्रामाणिक होती परतु ज्या व्यक्तींनी तिचा मसुदा तयार केला त्याचा हेतु प्रामाणिक नव्हता हे मला माहीत आहे एकाद्या ढालीसारखा तिच्या आड दडण्याकरता त्याना तिचा उपयोग करावयाचा होता १९१६ साली दोस्त राष्ट्राविरुद्ध युद्ध चालू होते मेसापोटेमियामध्ये जबर हानि झाली होती भरपूर सदिच्छा असूनही आणि अत्यत जोरदार प्रयत्न करूनही युद्धप्रयत्नाच्या बाबतीत भारत सरकार अकार्यक्षम ठरलें होतें कनिष्ठ सभागृहात मि. मॉटेग्यु यानी असें जाहीर केले की, "भारतातील ही राज्य पद्धति अत्यत ताठर व कडक असून आधुनिक कार्यपद्धतीच्या दृष्टीनें आवश्यक त्या लवचिकपणाचा तिच्यात पूर्ण अभाव आहे भारतीय लोक अत्यत राजनिष्ठ असूनही अशा पद्धतीमुळें तेथील सरकारला युद्धकार्यास दे

त्याचा चागला उपयोग करून घेता आला नाही." तें पुढें म्हणतात की, "या युद्धात किंवा पुढच्या कोणत्याही युद्धात जर तुम्हाला भारताचे सहाय्य पाहिजे असेल तर तुम्ही तेथील लोकाना तेथल्या सरकारात त्याचे स्थान कोणतें राहील हे स्पष्ट सागावयास हवे आणि हिंदुस्थानातील सरकारसबधी तुमच्या भावी उद्देशाबद्दल एव निवेदन जाहीर करावयास पाहिजे त्यांच्या देशप्रेमाला तुम्ही आवाहन करावयास पाहिजे, कारण देशप्रेम हाच तें आपला धर्म समजतात आणि मग जर पुढें कधी युद्ध झालेंच तर भारत त्यात अत्यत कार्यक्षमपर्णे मदत करावयास सिद्ध झालेला तुम्हाला आढळून येईल" हे शब्द अगदी स्पष्ट असून त्याचाच अखेर मि लॉइड जॉर्ज यानी स्वीकार केला आणि १९१७ साली त्यानी त्या घोषणेला अधिकृत पाठिंबा दिला युद्धाचे हेतु आणि ध्येय त्यानी अगोदरच जाहीर केलें होतें ग्लासगो येथें केलेल्या एका भाषणात ते म्हणाले होते :

"आता आपल्याला फार मोठ्या आणि गंभीर लढ्याला तोंड द्यावयाचे आहे. फक्त माणसांतच नव्हे तर राष्ट्राराष्ट्रात–लहान आणि मोठ्या, सर्वशक्तिमान आणि दुर्बळ, मान्यता पावलेल्या आणि विनम्र असलेल्या सर्व राष्ट्रांराष्ट्रांत, तेथील जनसमुहात–समता आणि बंधुभाव निर्माण करण्याचे आपणाला आव्हान देण्यात आलेलें आहे. माझ्या देशबांधवांना आणि जर इतर देशांतील लोकांपर्यंत पोहचत असेल तर त्यानाही माझी अशी विनंती आहे कीं, आंतरराष्ट्रीय हक्कांच्या आणि न्याय–रक्षणाच्या थोर ध्येयासाठी त्यानीं आपला लढा चालू ठेवला पाहिजे, म्हणजे पुन्हा कधींहि पाशवी बल न्यायासनावर स्थानापन्न होणार नाही आणि कधींहि राजदंड हातात घेणार नाहीं."

मी अगोदर सागितल्याप्रमाणें १९१६ साली युद्धाचे पारडे दोस्त राष्ट्राच्या विरुद्ध झुकू लागले होते संयुक्त सस्थानानी युद्धात प्रवेश केला नव्हता आणि त्यानी प्रवेश केल्याशिवाय युद्ध जिकता येणार नाही हे दोस्त राष्ट्राच्या लक्षात आलें होतें सयुक्त सस्थानानीं त्यात प्रवेश करावा अशी त्याची इच्छा होती.

परतु अध्यक्ष विलसन यानी सागितल्याप्रमाणें खरोखरच दोस्त राष्ट्राचे ध्येय आणि हेतु आहेत अशी तेथील लोकमताची खात्री पटल्याशिवाय सयुक्त सस्थाने युद्धान सामील होणार नव्हती अमेरिकेतील लोकमताला मान देणे आवश्यक होतें दोस्त राष्ट्राचे ध्येय आणि हेतु शुद्ध असून जागतिक शातता आणि लोकशाही याच्या रक्षणाकरता युद्ध लढले जात होते असें अमेरिकन जनतेला दाखविणे आवश्यक होते

## रौलट विधेयक

अध्यक्ष महाशय, असा त्या घोषणेमागचा इतिहास होता त्यानतर ज्या घटना घडल्या त्यावरुन त्या घोषणेचा मसुदा तयार करणाऱ्याचा हेतु प्रामाणिक नव्हता हे माझे विधान अगदी उत्तम रीतीने सिद्ध झाले आहे नतर आपल्याला काय दिसले ? तावडतोब युद्धाचे पारडे दोस्त राष्ट्राच्या बाजूला फिरले आणि युद्ध सपण्याच्या अगोदरच भारत सरकारने काय केले ? त्यानी इपिरिअल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये कुप्रसिद्ध रौलट विधेयक माडले ते विधेयक माडताना भारतातील सर्व लोकाबद्दल कमालीचा अविश्वास व्यक्त करण्यात आला आहे त्या विधेयकाला एकमतानें सर्वत्र विरोध झाला या देशातील प्रत्येकजण त्यातील उपाययोजनेच्या विरुद्ध होता परतु एवढ्या मोठ्या लोकमताची पर्वा न करता, कायदेमडळातील सर्व पक्षाच्या सभासदाच्या विरोधालाही न जुमानता भारत सरकारनें ते विधेयक समत करून कायदा केला त्यावेळी माझे मित्र श्री. जिना हे सुप्रिम लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद होते त्यानी आपल्या सभासदत्वाचा राजिनामा दिला आणि गव्हर्नर-जनरल याना एक पत्र लिहिले ते पत्र येथे वाचून दाखविले पाहिजे असें मला वाटते कारण त्यात दाखविलेल्या परिस्थितीचे आजच्या परिस्थितीशी साम्य आहे असें मला वाटते. श्री. जिना म्हणतात —

"लोकांच्या मताविरुद्ध भारत सरकारनें रोलट विधेयक संमत केल्यामुळें आणि त्याला आपण गव्हर्नरजनरल म्हणून मान्यता दिल्यामुळें ब्रिटिश न्यायदानावरील येथील जनतेचा विश्वास फार मोठ्या प्रमाणांत ढळला आहे. तसेंच इंपिरिअल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची रचना कशी आहे तें यामुळें उघड झालें आहे. ते नांवापुरतेच कायदेमंडळ असून परकीय सत्ताधान्यांकडूनच त्याला चालना दिली जाते. बिनसरकारी भारतीय सभासदांचे एकमत आणि बाहेरील सर्व लोकांचे मत आणि भावना यांची या कायदेमंडळाला मुळीच कदर नाही. तथापि जी उपाययोजना निःसंशय तिरस्करणीय आणि दडपशाहीची आहे तिला कायद्यांत जागा देऊन भारत सरकारनें आणि आपण अंमलबजावणी करणाऱ्याकडेच न्यायदानाचे कार्य सोपविले आहे. शिवाय हें विधेयक संमत करून आपल्या सरकारनें एका वर्षापूर्वी युद्धपरिषदेमध्यें भारताची मदत मिळ-विण्याकरिता जे मुद्दे मांडले होते त्यांच्या विरुद्ध वर्तन केले आहे, आणि ज्या करतां ग्रेटब्रिटन युद्धांत उतरले आहे त्या तत्त्वालाच हरताळ फासला आहे."

त्या कायद्यातील सुधारणा अंमलांत ेण्यापूर्वी भारताची आणि येथील कायदेमंडळाची जी अवस्था होती तीच अजूनही कायम आहे असे माझे म्हणणे आहे. नि.संशय आम्हाला बोलण्याची, अगदी कधीही न संपण्याइतकें बोलण्याची संधी देण्यात आली आहे. सरकारपुढें आमचे मत माडण्याचीही आम्हाला काही प्रमाणांत संधी देण्यात आली आहे. परंतु आजही, १९१९ साली श्री. जिना यांनी पत्रात लिहिल्याप्रमाणें केंद्रीय कायदेमंडळ आपली इच्छा अंमलात आण-ण्याच्या बावतीत तितकेच असमर्थ, अधिकारहीन आणि पूर्णपणे दीनवाणे आहे. (हास्य).

( सर वॉल्टर विल्सन – रिझर्व्ह बँकेच्या बावतीत काय ?

रिझर्व्ह बँकेबद्दल बोलून माझे मित्र हंसत आहेत. रिझर्व्ह बँकेबद्दल काय ? रिझर्व्ह बँकेची मागणी नाकारल्यामुळें त्या क्षेत्रांत अजूनहि तुम्हीच मालक

आह्वान त्या बाबतीत तुमच्या इच्छेची अमलबजावणी तुम्हाला करावयाची होती, आणि आम्ही त्याला विरोध केला पण आमच्या इच्छेला तुम्ही कधीच मान्यता दिली नाही मीठावरील कराच्या बाबतीत काय झाले ? संस्थानिकाच्या संरक्षणासंबंधीच्या विधेयकाच्या बाबतीत काय झाले ? त्या प्रकरणात तुम्ही काय केले ? चलनाबद्दल नेमलेल्या रॉयल कमिशनच्या शिफारशीसंबंधी तुम्ही काय केले आहे ? ( एक सभासद–स्कीन समितीचे काय ? ) होय. मी आता त्याकडेच वळणार आहे भारतीय खजिन्यावर ली कमिशनच्या अहवालानुसार लादण्यात आलेल्या आणखी खर्चाला भारतात एकमताने विरोध करण्यात आला येथील लोकांनी एकमताने सैन्यामध्ये राखीव प्रतिनिधीत्वाची आणि सैन्याचे भारतीयकरण करण्याची सतत मागणी केली आहे, पण तुम्ही एकसारखी ती नाकारली आहे आता असे ही कळते की, स्कीन समितीची एकमताने केलेली शिफारस मान्य करण्यात आलेली नाही हे आपल्या सद्हेतुचे पुरावे आहेत

## निर्घृण सरकारी यंत्र

अध्यक्ष महाशय, मला असे सांगावयाचे आहे की, येथील ब्रिटिश सरकार आणि त्याच्याशी एकरूप झालेला युरोपियन व्यापारी समाज याचा आम्हाला स्वराज्य देण्याचा किंवा स्वराज्याच्या दिशेने वाटचाल करू देण्याचा मुळीच उद्देश नाही त्यांचे हितसंबंध एकरूप झाले आहेत अधिकारावर असलेल्या किंवा नसलेल्या इंग्रजांचा उद्देश फक्त नफेबाजी आणि अधिकार गाजविण्याचाच आहे आणि त्याच्याकडून दयावृत्तीची आम्ही अपेक्षा करीत नाही कोणाही व्यक्तीविरुद्ध मला काही सांगावयाचे नाही ही सत्ता म्हणजे अंतःकरणहीन, निर्घृण असे एक यंत्र आहे त्याला फक्त पिळवणूक करून नाश करणेच मोहीत आहे याच यंत्राने आम्हाला भिकारी बनविले हे आम्हाला समजत नाही काय ?

आज आमची काय अवस्था आहे ? १५५ ते १७५ वर्षांच्या ब्रिटिश राजवटी-नंतर आज या देशात आमची काय स्थिति आहे ? (एक सन्माननीय सभासद—त्यापूर्वी तुमची स्थिति कशी होती ?) आम्ही स्व चे सरक्षण करण्यास असमर्थ आहात आम्हाला आमच्या घरादाराचे रक्षण करता येत नाही, आम्हाला आमच्या रेल्वेचीसुद्धा व्यवस्था करणें जमत नाही, असें म्हटलें जाते आम्हाला फक्त रेल्वेची व्यवस्था जमत नाही असें नाही तर आमच्या आर्थिक बाबींचीही आम्हाला व्यवस्था करता येत नाही ग्रेट ब्रिटनची सपत्ति वाढविण्याच्या कामी ब्रिटिश सरकारच्या हातातील बाहुली बनण्यावाचून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीला आम्ही लायक राहिलो नाही आम्ही फक्त कर द्यावयाला लायक आहोत, फक्त दुसऱ्याच्या हातातील बाहुली बनण्यास योग्य आहोत, पण स्वाभि-मानी राष्ट्रावडून ज्या गोष्टीची अपेक्षा आहे अशा कोणत्याही दुसऱ्या गोष्टी करण्यास आम्ही असमर्थ, पूर्ण असमर्थ आहोत हा त्याच्या सरकारी यत्राचा प्रभाव आहे आणि त्याना जर त्याबद्दल अभिमान वाटत नसेल तर खुशाल वाटो माझी हरकत नाही ती पण माणसेंच आहेत येथें पैसा करण्याकरता, आपले खिसे भरण्याकरिता ते आले आहेत (हास्य) आणि प्रत्येक उपलब्ध साधनाचा उपयोग करून ते आपले खिसे भरत आहेत. पण त्यानी आपण विश्वस्त आहोत असे म्हणू नये याच गोष्टीला माझा विरोध आहे ते जर विश्वस्त अस-तील तर विश्वस्त निधीची पैन्-पै गिळकृत करणाऱ्या विश्वस्ताच्या जातीचे आहेत (हास्य ) ते खरे विश्वस्त आहेत काय ? या गोष्टीवर माझा विश्वास नाही " आम्ही भारताला तलवारीच्या जोरावर जिंकले आहे आणि तल-वारीच्या जोरावरच त्याला ताब्यात ठेवण्याची आमची इच्छा आहे " असे आता मत्रिपदावर असलेले सर विल्यम जॉन्सन हिक्स काही काळापूर्वी म्हणाले होते अध्यक्ष महाशय, ज्या वेळी १९१९ साली या सुधारणाच्या बाबतीत जोराने विचार चालू होता त्या वेळी अँग्लोइडियनाचे एक मोठे प्रतिनिधी सर जॉर्ज चेस्नें यानी आपल्या "भारतातील प्रयोग" (इंडिया अडर एक्सिपिरीमेंट) या

पुस्तकात "भारत आम्हाला आमचे अन्न पुरवीत आहे, त्याला आम्ही आमच्या हातातून जाऊ देणार नाही, " असेच जवळ जवळ म्हटले आहे. त्याचा दृष्टिकोण हा असा आहे हें मला माहीत आहे. या बाबतीत आम्ही असाहाय्य आहोत. आम्हाला वस्तुस्थितीची जाणीव करून देण्याचा लॉर्ड बर्कनहेड याचा उद्देश आहे पण आम्हाला ती माहीत नाही काय ? **आम्ही पुरुषत्वहीन झालो आहोत,** आमच्या हातात काही अधिकार नाही, या सरकारने आम्हाला पूर्ण निःसत्व करून टाकले आहे हे आम्हाला माहीत नाही काय ? आम्हाला यानी फक्त निःसत्वच केले आहे एवढेच नाही तर आमच्या देशातील **लोकांत परस्पर वैमनस्याचे विष त्यांनीं पसरविलें आहे.** आणि तरीही मी अशा सरकारला पाठिंबा देत आहे. ( घृणास्पद, घृणास्पद अशा आरोळ्या) आम्हाला सर्व गोष्टी माहीत नाहीत काय ? या पद्धतीला माझा विरोध आहे या सुधारणाच्या मागचा सर्व इतिहास पाहता १९१७ साली ब्रिटिश मुत्सद्यानी जे सांगितलें ते मनापासून सांगितलें नव्हतें असें आम्हाला दिसून आलें आहे. स्वराज्याचा हप्ता देण्याची त्यांची खरीच इच्छा होती काय ? नाही, तशी त्याची इच्छा नव्हती ते आम्हाला चिरडून टाकीत आहेत, आमचे सर्व निर्णय ते पायाखाली तुडवीत आहेत, ते आम्हाला गुन्हेगार -- अगदी सामान्य गुन्हेगार--समजत आहेत, ते आम्हाला पोलिसाच्या निरीक्षणाखाली ठेवत आहेत, आमची पत्रे ते फोडतात, आगगाड्यातही आमच्यामागे गुप्त पोलीस पाठवतात आणि तरीहि या देशातील ब्रिटिश सरकारची आम्हाला स्वराज्य देण्याची खरी इच्छा आहे यावर आम्ही विश्वास ठेवावा असें त्याना वाटते या पोकळ घोषणावर माझा विश्वास नाहीं आणि आताचे हें पूर्णपणे ब्रिटिश कमिशन नेमण्याच्या मागील सरकारच्या *सद्‌हेतुबद्दलही मला खात्री नसण्याचे तें एक कारण आहे. अध्यक्ष महाशय, मला* जास्त मागावयाचे नाही माझ्या मित्राना, या सभागृहातील भारतीय सभासदाना, मला फक्त एक विनंती करावयाची आहे मित्रानो, ज्यावेळी तुम्हीं *मतदान कराल... .*

( अध्यक्ष – आपण अध्यक्षाना उद्देशून बोला )

## ब्रिटिशांचा भारतीयांबद्दल दृष्टिकोण

क्षमा करा अध्यक्ष महाशय आपल्यामार्फत मला आमच्या बाजूच्या सभासदाना असें सांगावयाचे आहे की, ब्रिटिश सरकार आणि सर्व जग याच्या दृष्टिकोणातून ते केवळ गुलाम आहेत हे त्यानी लक्षात घ्यावे या ठरावावर मतदान करते वेळी त्यानी हें विसरू नये की, १९१८ सालच्या एका तापसरी-मध्ये आमचे सहा कोटी लोक मृत्युमुखी पडले आमच्यापैकी १० कोटी गरीब जनतेला रोज दोन वेळा जेवणही मिळत नाही, हेंही त्यानी लक्षात असू द्यावे. आम्ही ब्रिटिशाच्या इच्छेपुढें मान तुकविल्याशिवाय आणि कायदेमंडळात किंवा अमलबजावणी करणाऱ्या खात्यात त्याची री ओढल्यावाचून या देशाचे सरकार चालविण्याच्या बाबतीत आम्हाला कोणतेंही मानाचे स्थान मिळत नाही हें त्यानी लक्षात ठेवावे अध्यक्ष महाशय, या सर्व गोष्टी त्यानी ध्यानात ठेवल्या पाहिजेत आमच्या मनात कोणताही सभ्रम नाही, आम्ही असाहाय्य आहोत याची आम्हाला जाणीव आहे आमच्या भोवती मोठमोठ्या लाटा उठत आहेत हे आम्हाला माहीत आहे. कोणत्याही क्षणी आमची ही दुबळी होडी उलटून भयंकर समुद्राच्या तळाशी जाण्याचा धोका आहे याची आम्हाला कल्पना आहे आम्ही ज्वालामुखीच्या मुखाशी बसलो असून कोणत्याही क्षणी तो भडकून त्याच्या ज्वालात आम्ही भस्मसात होऊ हेंही आम्हाला ठाऊक आहे. आम्ही हवेत अधातरीच लोंबकळत आहोत आणि या दांभिक सरकारने दिलेल्या वचनामुळें आमचे देशबांधव सभ्रमात सापडले आहेत आम्हाला हे सर्व माहीत आहे आम्ही कड्यावर लोंबकळत असून कोणत्याही क्षणी कोसळून त्याखाली गाडले जाऊ याची आम्हाला जाणीव आहे परतु हे सर्व माहीत असूनही त्यानी आमच्याकडे फेकलेले तुकडे स्वीकारण्याची आमची इच्छा नाही. आम्ही

आमच्या वर्तनाला चिकटून राहू आणि स्वाभिमानापूर्वक नाहीसे होऊ सरकारी पक्षाच्या गोटात जाऊन बसल्यास आपणाला वैयक्तिक सुखात आणि ऐषआरामात जगता येईल याची आमच्यापैकी काही जणाना जाणीव आहे ते आम्हाला उत्तम रीतीने माहीत आहे परंतु आम्ही तसे करणार नाही आपल्या लोकाविषयी, या देशातील राजकीय आणि आर्थिक निर्घृण यंत्रणेच्या पिळवणुकीमुळे ज्याना पोषणासाठी दूध न मिळाल्याने लाखानी मृत्यूला कवटाळावे लागत आहे अशा बालकाविषयी, आपले काही कर्तव्य आहे याचा या सभागृहातील भारतीय सभासदाना विसर पडणार नाही अशी मला आशा आहे या पृथ्वीच्या पाठीवरील *प्रत्येक सरकार आपल्या लोकाच्या स्वास्थ्यरक्षणासाठी आणि* त्याच्यातील चैतन्य वाढावे म्हणून शक्य ते सर्व प्रयत्न करीत असते, पण आमचे सरकार तसे करणार नाही, कारण आमच्याकडून जो पैसा ते काढतात तो त्याना स्वत च्या आणि अँग्लोइंडियन व्यापारी समाजाच्या हिताकरता हवा असतो हे व्यापारी लोक आमचे फार मोठे मित्र आहेत म्हणून सागतात *आम्हाला त्यानी आगगाड्याचे मार्ग दिले असे सांगितले जाते*

(अध्यक्ष – माननीय सदस्यानी आपले भाषण लवकर आटपावे )

मी एक मिनिटात संपवतो माझ्या मुसलमानमित्राना मला एक गोष्ट सागावयाची आहे, ती एवढीच की, 'बंगालची फाळणी विसरू नका, सेवसचा तह *विसरू नका " या सरकारने कितीहि वचने दिली तरी त्याचा तुम्हाला* काही उपयोग होणार नाही **इस्लाम तुम्हाला लोकाचे गुलाम होण्यास, त्यांच्या पुढे पुढे करण्यास सागत नाही** मला त्याना सागावयाचे आहे की, " माघार घेऊ नका धैर्य धरा आणि या लढ्यात सामील व्हा " हे कमिशन गेल्यावर काही हा लढा संपणार नाही तो नतर चालू राहाणार आहे आपले कार्य फार अवघड आहे परतु मी तुम्हाला असे आश्वासन देतो की, कोणत्याही परिस्थितीत आपण आपली दु खे शातपणाने सहन करू **ब्रिटिशाकडे आपण दयेची**

याचना करावयाची नाहीं आम्हाला करुणा भाकावयाची नाही, पण त्याचवेळी, आम्हाला आमच्या घराचे धनी व्हावयाचे आहे तुम्ही आमची भूक भागविण्या-साठीं तुकडे टाकल्यास त्याचा आम्ही स्वीकार करणार नाहीं हे आम्ही मनाशी पक्के ठरविले आहे, ही गोष्ट इंग्रज राष्ट्राच्या मनावर ठसविण्याचे कामीही आपण शक्य ते सर्व प्रयत्न केले पाहिजेत
अध्यक्ष महाशय, मी माझा ठराव मांडतो

## चर्चेला उत्तर

[ या ठरावावरील चर्चेला लालाजीनी पुढीलप्रमाणे उत्तर दिलें.]

### ठरावाबद्दल गैरसमज

अध्यक्ष महाराज, माझ्या उत्तराच्या सुरुवातीलाच मला हें स्पष्ट करावयाचे आहे की, कोणत्याहि तऱ्हेच्या असहकाराच्या सामान्य योजनेच्या पुरस्काराचा अंतर्भाव या ठरावात करण्यात आलेला नाही त्या दृष्टीने त्याच्या-वर करण्यात आलेली सर्व टीका मुद्याला सोडून आहे हा ठराव सध्या अस-लेल्या कमिशनशी असहकार करण्यापुरताच मर्यादित आहे, त्यापेक्षा अधिक त्यात काही नाही, अशी जी भूमिका अध्यक्षांनी घेतली आहे ती मी पूर्णपणे समज शकतो असहकाराच्या तत्वावर माझा विश्वास आहे तसा विश्वास मी सतत ठेवत आलो आहे परंतु ते तत्व तर्ककठोरतेने जास्त ताणता येणार नाही, या गोष्टीवरही माझा विश्वास आहे म्हणून या क्षणी असहकाराच्या कोणत्याहि सामान्य योजनेची मी मागणी करीत नाही सध्याच्या, त्याच्या घटनेप्रमाणे हे कमिशन आम्हाला मान्य नाही आणि त्याच्याशीं आम्हीं कोण-त्याहि प्रकारचा संबध ठेवणार नाही याबाबतीत सभागृहाच्या या बाजूच्या सर्व लोकांचे एकमत आहे आमची भूमिका ही अशी आहे, या क्षणी यापेक्षा कमी अधिक आम्हाला काही नको

# राजकीय सुधारणांची घोषणा

अध्यक्ष महाराज, त्यानंतर संयुक्त संस्थानानी युद्धात भाग घेतल्याबद्दल जो मी उल्लेख केला त्याबद्दल मला स्पष्टीकरण करावयाचे आहे. त्या घोषणेनंतर संयुक्त संस्थाने युद्धात सामील झाली असें मी केव्हाहि म्हटलें नाही. संयुक्त संस्थानाच्या युद्धप्रवेशाची मी कारणमीमांसा दिली. आणि मला आनंद वाटतो की, माझ्या या विधानाला एका अधिकारी व्यक्तीनें पाठिंबा दिलेला आहे. त्याचे म्हणणे मी आपणापुढे मांडतो. १९१६ साली युद्धाचे पारडे दोस्त राष्ट्राच्या विरुद्ध झुकू लागले होते, हा माझ्या सांगण्याचा मुद्दा होता. आणि ती गोष्ट माननीय गृह सदस्यांनीं लक्षात ठेवावी असे माझें मागणे आहे अमेरिकेतील संयुक्त संस्थानानी युद्धात प्रवेश करावा म्हणून दोस्त राष्ट्रे फार उत्सुक होती, आणि युद्धाचे हेतु आणि ध्येय आणि भारतीय जनतेविषयीच्या ब्रिटिशाच्या हेतूची खात्री पटल्याशिवाय संयुक्त संस्थाने युद्धात उतरणार नव्हती. अध्यक्ष महाराज, याच दृष्टीनें भारताविषयीच्या घोषणेची योजना १९१६ साली ठरविण्यात आली, पण ती १९१७ च्या ऑगस्टमध्ये जाहीर करण्यात आली. मला जे सांगावयाचे आहे तें हेंच आहे आणि माझ्या या विधानाला बळकटी देणारे फार मोठ्या अधिकारी व्यक्तीचे निवेदन मी सांगणार आहे. वरिष्ठ सभागृहाचे सदस्य या नात्यानें बोलताना लार्ड चेम्सफर्ड यानी २४ नोव्हेंबर १९२७ रोजी पुढील निवेदन केले:

"व्हाईसराय म्हणून भारताला परत जाण्याच्या पूर्वी सहा आठवडे १९१६ सालच्या जानेवारीमध्यें मी स्वदेशी आलो. येथे आल्यावर मला कळले की, 'इंडिया ऑफीस' मध्ये एक समिती स्थापन करण्यात आली असून ती पुढील घटनात्मक विकास कोणत्या दिशेने करण्यांत यावा याचा विचार करीत होती. मी मार्चच्या मध्याला परतण्याच्या अगोदर त्या समितीनें पुढील घटनात्मक

विकासाबाबत स्थूल रूपरेखा दाखविणारे एक पत्रक मला दिले. मी भारतांत आल्यावर तें पत्रक माझ्या कौन्सिलला आणि त्यावेळी संयुक्त प्रांताचे लेफ्टनंट गव्हर्नर असलेले माझे माननीय मित्र लार्ड मेस्टन याना दाखविले. त्यामध्ये सांप्रत ज्याला द्विदल पद्धत म्हणतात तिच्या तत्त्वांचा अंतर्भाव करण्यांत आला होता!"

जरी याबाबतीत घोषणा १९१७ मध्ये झाली तरी ही योजना १९१६ मध्येंच तयार करण्यात आली होती. माझ्या सन्माननीय मित्रानी सांगितल्याप्रमाणे संयुक्त संस्थानांनी १९१७ च्या एप्रिलमध्ये युद्धात प्रवेश केला. म्हणजे मी म्हणत होतो ते अगदी बरोबर होते. त्याच भाषणात लार्ड चेम्सफर्ड पुढे म्हणतात

"मि. मॉंटेग्यु याच्या मुखाने ती घोषणा करण्यात आली हे जरी खरे असले तरी त्या घोषणेचा मुख्य भाग मि. मॉंटेग्यु यांनी अधिकारग्रहण करण्याच्या पूर्वीच तयार करण्यात आला होता, ही गोष्ट सर्वश्रुत आहे."

माझ्या मते माननीय गृह सदस्याच्या आक्षेपाला हे उत्तर पुरेसे आहे.

## असहकार मोहीम

अध्यक्ष महाराज, माननीय सभागृहाच्या नेत्यानी काही निवेदने वाचून दाखविली त्यापैकी एक निवेदन ज्यावेळी भारतात असहकाराची मोहीम चालू होती त्या वेळी कर्नल वेजवुड यानी केलेले होते मला वाटते, ज्यामध्ये त्यांनी फक्त या कमिशनवरील बहिष्काराबाबतच नव्हे तर असहकाराच्या चळवळीबद्दलहि आपली भूमिका स्पष्ट केली आहे असे त्याचे अगदी अलीकडचे निवेदन वाचणेच अधिक चांगले होईल. कनिष्ठ सभागृहात २५ नोव्हेंबर १९२७ रोजी त्यानी पुढील विधान केले.

"शेवटी मला एवच सागावयाचे आहे की, भारतातील राजकारणी लोका च्या असहकाराला मी सतत विरोध केला आहे असहकाराचा काही उपयोग नाहीं सरकार चालविण्याच्या यन्त्रणेशी असहकार करण्यामुळें दुसऱ्या कोणाचे नाही पण असहकार करणाऱ्याचेच नुकसान होतें परतु परकीयाची आपणावर कृपादृष्टी व्हावी म्हणून अर्जविनत्या करण्याचे नाकारणे ही अगदी निराळी गोष्ट आहे कमिशनपुढे जरी भारतीय लोकानी साक्षी दिल्या नाहीत तरी त्यात त्याचे काय नुकसान होणार आहे ? या कमिशनला हवी असलली माहिती भरपूर प्रमाणात मुद्दीमन कमिशनच्या अनेक अहवालातून मिळू शकेल असे अहवाल त्याना भारताच्या प्रत्येक प्रातातून मिळू शकतील याचा अर्थ माहितीचा अभाव जाणवणार नाहीं '

असहकाराबद्दल कर्नल वेजवुड याच्या मताला कितीही महत्त्व असल तरी त्यानी नुकत्याच बहिष्कारासबधी केलेल्या ज्या विधानात पूर्वी असहकारा सबधी केलेल्या विधानाविरुद्ध मत माडले आह ते या सभागृहाच्या निदर्शनास आणल्यावाचून पूर्वीच्याच विधानाचा उल्लेख करणे योग्य नाही त्या दोन विधा नात महदतर आहे

आता मला एक दुसरा मुद्दा स्पष्ट करावयाचा आहे ब्रिटिश पार्लमेंटने भारताला स्वराज्य देण्याबद्दल बराच आग्रह धरला आहे असें ऱ्या बाजूच्या सभासदानी बऱ्याच वेळा सागितले असा आग्रह त्यानी धरल्याच माझ्या तरी माहितीत नाही आम्हाला तरी दुसरे काय हवे आहे ? आम्हाला फक्त स्वरा ज्यच हवे आहे आणि जर ब्रिटिश पार्लमेंट ते देत असल तर आम्ही त्याचा मोठ्या आनदाने स्वीकार करण्यास तयार आहोत माझ्यावर टीकेचा भडिमार करूनही शेवटी माझे मित्र डॉ सुऱ्हावर्दी हे काय म्हणतात त म्हणतात आम्हाला भरपूर वचने देण्यात आली आहेत जाहीरनामेही पुष्कळ काढण्यात आले आहेत सहकार्याची आश्वासनेंहि पुष्कळ करण्यात आली आहेत या सर्व

जे आतापर्यंत ब्रिटिश सरकारशी एकनिष्ठ होते आणि ज्यांच्या उच्च राजकीय शहाणापणाबद्दल त्याची कीर्ति झाली होती असे सर्व लोक याक्षणी कमिशनशी सहकार करण्याच्या विरुद्ध आहेत. बहिष्कार टाकणे हाच एक सन्माननीय मार्ग आहे असे ते म्हणत आहेत. या गोष्टीचे भारत सरकारला किंवा ब्रिटिश सरकारला काहीच महत्त्व वाटत नाही काय? हे कमिशन आपले काम पुढे चालू ठेवणार नाही या भ्रमात आम्ही नाही. कोणताही बदल घडेल अशी आमची अपेक्षा नाही, आम्हाला कोणताही बदल घडावयास नको "लाखो मुसलमान," "लाखो दलित वर्गांचे लोक" आणि "लाखो अँग्लोइंडियन" याच्या सहाय्याने कमिशन आपले कार्य चालू ठेवणार नाही असा भ्रम आम्हाला झालेला नाही. आम्ही फक्त एवढेच म्हणत आहोत की, ज्यामध्ये आम्हाला समान योग्यता आणि समान हक्क देण्यात आलेले नाहीत अशा कोणत्याही करारात आम्ही स्वेच्छेने भाग घेणार नाही. आमच्या परिस्थितीची आम्हाला जाणीव आहे कोणतेही दम देण्याची किंवा पोकळ धमेंड मारण्याची आमची इच्छा नाही ज्या अटीवर त्याच्याशी आम्ही सहकार्य करावे अशी कमिशनची इच्छा आहे त्या अटीवर त्याच्याशी आमचा स्वाभिमान आम्हाला सहकार्य करू देत नाही, असे आम्हाला वाटते.

**श्री. चतर्जी** यानी वक्तृत्वपूर्ण भाषण केले. मला वाटते मलाच उद्देशून ते म्हणाले की, ते एका "पुढाऱ्याकडे" गेले होते आणि मी त्याचे समाधान करू शकलो नाही. त्याच्या माझ्याशी झालेल्या बोलण्याचा सारांश मी सांगू शकत नाही; कारण खाजगी सभाषणाचा उल्लेख सभागृहात करणे नियमाच्या विरुद्ध आहे. त्यानी त्या भाषणातील काही भागाचा येथे जो उल्लेख केला तो योग्य होता असे मला वाटत नाही एरवी त्याचे बोलणे किती [illegible] पणाचे [illegible] आहे हे मी आपणाला दाखवून दिले असते

नंतर मी माझे मित्र सर हरिसिंग गौर याचेकडे वळतो. [illegible]

मुद्दा मला समजला नाही. त्यानी सर्वसामान्य खुलासा केला आहे आणि माझ्या ठरावाचा उद्देश असहकाराचा असल्यामुळे त्याला त्याचा विरोध आहे असें ते आपणास सांगत आहेत. त्यांनी मला केलेल्या तारेत कळविले आहे की, 'सर्व पक्षानी एकमतानें मान्यता दिल्यास बहिष्काराला माझा पाठिंबा आहे.' आता त्यानी घेतलेली भूमिका निराळी आहे. त्यानी आपले मत बदलले आहे, त्याना तसें करण्याचा हक्क आहे; पण त्याचे पूर्वीचे मत कशा प्रकारचे होते हे त्यानी विसरू नये.

(*सर हरिसिंग गौर*—*माझा एक हरकतीचा मुद्दा आहे. माझे सन्माननीय* मित्र विसरलेले दिसतात. मी असे काही कधीही म्हटले नव्हते.

*अध्यक्ष — हा हरकतीचा मुद्दा होऊ शकत नाही.*

**सर हरिसिंग गौर**—हा माझा वैयक्तिक खुलासा आहे. )

ती तार अजून माझ्याजवळ आहे. मी मोठ्या आनंदानें तिची एक प्रत त्याना पाठवीन.

## मुस्लिम बांधवांना आवाहन

आता चर्चा अधिक वाढविण्याची माझी इच्छा नाही. माझ्या मुसलमान मित्राना मला एक दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत. हिंदु-मुसलमान याच्या प्रश्नावर **श्री.** *शाह नवाझ माझ्याशी बोलत होते. आणि त्याच प्रश्नाचा उल्लेख* **डॉक्टर सुन्हावर्दी** यानी केला आहे. विभक्त मतदार संघाबद्दल ते पुन्हा पुन्हा बोलत आहेत. मी त्याना असें आश्वासन देतो की, राष्ट्रीय मुसलमानांपैकी पुष्कळसे आमच्याशी सहमत असल्याशिवाय त्याच्यावर एकत्रित मतदारसंघ लादण्याचा सभागृहाच्या या बाजूच्या सदस्याचा मुळीच उद्देश नाही. त्याच्यापुढे गुडघे टेकून विनवण्या करण्याची आमची मुळीच इच्छा नाही. त्याच्या-

पकी एकजण, डॉ. सुन्हावर्दी, म्हणाले की, इंग्लंडच्या प्रामाणिकपणावर त्याचा विश्वास नाही. 'विश्वासघातकी' असा त्यानी इंग्लडचा उल्लेख केला. परंतु हिंदूंच्यावर त्याचा त्याहीपेक्षा कमी विश्वास आहे माझी त्याना विनती आहे की, सच्चा मुसलमान म्हणून त्यानी कोणावरच विश्वास ठेवू नये. हिंदु किंवा इंग्रज लोक यापैकी कोणावरच विश्वास न ठेवता त्यानी स्वत:च्या पायावर स्वतंत्रपणें उभे राहावें. दुसऱ्या कोणावर विश्वास ठेवण्याची त्याना काय आवश्यकता आहे ? "अल्लाशिवाय कोणावरही विश्वास ठेवू नका" असे त्याचे धर्मसंस्थापक सांगत आहेत त्याचा हिंदूंच्यावर विश्वास नसेल आणि इंग्रज लोक त्याना अधिक चांगली वागणूक देतील असे त्याना वाटत असेल तर त्याची मोठीच दिशाभूल होत आहे या देशात इंग्रज लोक कांहीं सतत राहणार नाहींत. त्यांना आणि आम्हाला मात्र येथे सतत राहावयाचे आहे. आज त्याचा हिंदूंच्यावर विश्वास नसेल पण केव्हा तरी तो ठेवण्याची त्याना सवय करून घ्यावी लागेल आमचा त्याच्यावर फार विश्वास आहे, आणि परमेश्वराने मदत केल्यास आम्ही आमचा त्याच्यावरील विश्वास सिद्ध करून दाखवू

## राज्यघटना तयार करण्याचें कार्य

राज्यघटना तयार करण्यात आम्हाला आलेल्या अपयशाबद्दल टोमणा देण्यात आला. तसे बोलणे फार सोपे आहे. कोणत्याही पक्षानें तयार केलेल्या राज्यघटनेबाबत एकमत होणें शक्य नाही निरनिराळे हितसंबध त्यात गुंतलेले आहेत काही हितसंबधी लोक तयार करण्यात आले आहेत, त्यामुळें कधीही एकमत होणार नाही जोपर्यंत तिसरा पक्ष उपस्थित आहे, तोपर्यंत राज्यघटनेच्या मसुद्याबाबत एकमत होणे अगदी अशक्य आहे. आम्ही आतापर्यंत त्या बाबतीत प्रयत्न केला नाही त्याचे हेंच कारण आहे परंतु परमेश्वराच्या

कृपेनें असें एकमत असलेली राज्यघटना आम्ही त्याना तयार करून दाखवू. शकू. तशी वेळ अजून आलेली नाही आताशी त्या गोष्टीला सुरुवात झाली आहे राज्यघटना काही एका दिवसात किंवा थोडक्या कालावधीत तयार होऊ शकत नाहीत. जगात कोणताही देश तसें करू शकला नाही संयुक्त संस्थानात राज्यघटना तयार करण्यास किती वेळ लागला ते पहा, प्रत्यक्ष इंग्लंडमध्यें-सुद्धा राज्यघटनेला किती काल लागला तें लक्षात घ्या, दक्षिण आफ्रिकेत-देखील या गोष्टीला किती वेळ लागला हेही पहा. आम्ही आतापर्यंत राज्यघटना तयार करू शकलो नाही असा टोमणा मारण्याचा काही उपयोग नाही. एखाद्या पोपटासारखें लॉर्ड बर्कनहेड पुन. पुनः ही गोष्ट का सागत आहेत ते मला चागले समजू शकतें. त्याच्या पक्षाचे या देशात बरेच वजन आहे आणि आपल्या हस्तका-कडून हालचाली करवून आमच्या राज्यघटना तयार करण्याच्या कामी ते अड-थळे निर्माण करू शकतात. म्हणून ती तयार करण्याची सवलत ते आम्हाला वारंवार देत असतात. तिला किती किंमत द्यावयाची ते आम्हाला कळते. तिला मुळीच महत्त्व नाही आणि ती सद्हेतूने दिलेली सवलत आहे यावर आमचा मुळीच विश्वास नाही असे असले तरी आम्ही आमच्याकडून जास्तीत जास्त प्रयत्न करीत आहोत. परमेश्वराच्या कृपेनें हिंदु आणि मुसलमान या दोघा-तील राष्ट्रवादी लोकात लवकरच राज्यघटनेच्या मुख्य मुद्यावर एकमत होईल आणि आम्ही तिचा मसुदा तयार करूं.

## जनतेचे मत

अध्यक्ष महाशय, मला सभागृहाचा जास्त वेळ घ्यावयाचा नाही, फक्त एक-दोन गोष्टी सागावयाच्या आहेत. एका माननीय सदस्यानी जनतेच्या मताच्या जबरदस्तीचा माझे सन्माननीय मित्र श्री. जयकर याच्या बाबतीत उल्लेख केला. परतु अध्यक्ष महाशय, सरकारच्या जबरदस्तीच्या मानाने जनमताची

आम्हाला जे वाटते ते सर्व त्यानें स्पष्ट होत नाही ज्या गोष्टीचा आमच्यावर फार मोठा परिणाम होणार आहे, त्या बाबतीत आमच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करण्याची, आम्हाला बाजूला सारण्याची तुमची कृति म्हणजे अपमान नाही पण त्यापेक्षाहि अधिक वाईट गोष्ट आहे

## अनियंत्रित सत्ता व लोकशाही

अध्यक्ष महाराज, लोकशाहीबद्दल बोलणे निघाले होतें समोरील बाजूचे लोक लोकशाहीबद्दल बोलू लागले म्हणजे मला शात राहना येत नाही हे सरकार म्हणजे लोकशाहीचा पूर्ण विरोधाभासच नाही काय ? या सभागृहातील लोकप्रतिनिधींची मतें रोज डावलण्यात येतात हे आम्हाला दिसत नाही काय ? अनियंत्रित राजसत्तेनें लोकशाहीबद्दल बोलणे म्हणजे एक नाटकेचाच प्रकार असून तो या सभागृहाऐवजी एखाद्या रगभूमीवरच शोभून दिसेल असें "लॉस्ट डोमिनियम"च्या लेखकाने एके ठिकाणी म्हटले आहे अधिक बोलण्याची माझी इच्छा नाही

मिस मेयो याच्या पुस्तकाचा येथे उल्लेख करण्यात आला त्याचा उल्लेख करण्याची माझी इच्छा नाही ते गलिच्छ पुस्तक मी त्याज्य समजतो

इग्लडमधील सर्व पक्षाचे या बाबतीत एकमत आहे असें मि रॅमसे मॅकडोनल्ड म्हणाल्याचे वारवार सागण्यात येते होय सर्व दरोडेखोर एकत्र आले आहेत हे आम्हाला माहीत आहे आमच्या मतें ते दरोडेखोरच आहेत आम्ही काय करावें अशी त्याची इच्छा आहे ? समजा एखादा डाकू आला आणि सगीन रोखून माझ्या वस्तु मागू लागला तर "होय, माझी मालमत्ता लुटण्याच्या कामी मी तुझ्याशी सहकार्य करतो ' असे मी त्याला सागावयाचे काय ? आम्ही तसें करणार नाही १५० वर्षांच्या प्रदीर्घ काळात आम्ही तसे केले आहे श्री चतर्जी याना माझें हें उत्तर आहे ते म्हणतात की, प्रयत्न करण्याची संधि देण्यास काय

[ लाल, बाल, पाल– पंजाब केसरी लाला लजपतराय, लोकमान्य बाळ गंगाधर टिळक आणि बिपिनचंद्र पाल– या सत्पुत्रांनी स्पष्ट शब्दात स्वातंत्र्य हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे असे इंग्रज सरकारला बजावले देशभर मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी बलिदानास सिद्ध झालेले तरुण पुढे सरसावले क्रांतीची प्रचंड लाट उठली त्या लाटेची सरकारला धास्ती बसली १८१८ च्या तिसऱ्या विनिमयाचा (Regulation III of 1818) आधार घेऊन सरकारने लोकांना पकडण्याचे सत्र सुरू केले चौकशीशिवाय पुष्कळांना डांबून ठेवण्यात आले, कित्येकांना हद्दपार करण्यात आले, कित्येकांच्या बाबतीत न्यायालयीन चौकशीचा नुसता देखावा करण्यात आला

बंगालमध्ये ही झळ अधिक जोरात लागली एक वटहुकूम काढून सरकारने कित्येकांना केवळ संशयावरून स्थानबद्ध केले परदेशात असलेल्या राश बिहारी घोष, सुधींद्र बोस, अश्विनीकुमार दत्त, कृष्णकुमार मित्र यांना स्वदेशात परतण्याचा परवाना नाकारण्यात आला सुभाषचंद्र बोस यांना अटक करण्यात आली बुजलेले जनावर जसे समोर दिसेल त्याला ठोकर मारते, तशी सरकारची अवस्था झाली

या सर्व परिस्थितीचे प्रतिध्वनि केंद्रीय विधान सभेत उमटले मौलवी अहमद शफी यांनी राजकीय कैद्यांची सुटका व्हावी अशा आशयाचा ठराव दि २६–१–१९२६ रोजी मांडला तो ठराव असा –

"ही धारा सभा गव्हर्नर जनरल यांना खालीलप्रमाणें शिफारस करत आहे: की (अ) ज्यांच्यावर कोणताही हिंसात्मक कृत्याचा आरोप सिद्ध झाला नाही अशा शिक्षा झालेल्या किंवा ज्यांची चौकशी चालू आहे अशा आणि ज्या राजकीय स्थानबद्धांच्या बाबतींत न्यायालयीन चौकशी करण्याचा सरकारचा विचार नाहीं अशा सर्वांची बिनशर्त मुक्तता करण्यांत यावी; (ब) या धारा-सभेची एक समिति नेमण्यांत यावी व ती शिफारस करील अशा शिक्षा झालेल्या किंवा ज्यांची चौकशी चालू असेल अशा सर्व राजबंद्यांना सोडण्यांत यावें; आणि (क) जे देशाबाहेर राहून भारतीय स्वातंत्र्यासाठीं प्रयत्न करीत आहेत पण ज्याच्या बाबतींत ते क्रांतिकारक चळवळीशीं संबंध ठेवत आहेत असा संशय आहे अशा सर्व 'हद्दपार' लोकांना त्यांचा मानभंग न होतां स्वदेशांत परत येण्याची मुभा द्यावी, मग त्याबाबतींत योग्य त्या अटी सरकारनें घातल्या तरी चालेल."

या ठरावाला सन्माननीय सदस्य सी. एस्. रंगा अय्यर, सय्यद मजीद बक्ष, एम्. के. आचार्य, लाला दुनीचंद, कुमार शंकर रे, एम्. व्ही. अभ्यंकर, मॅ. महम्मद अली जीना आदीनी पाठिंबा दिला गृहसदस्य सर अलेक्झांडर मुद्दिमन यानी या चर्चेला उत्तर दिले

वरील तिन्ही जुलमी प्रकाराचा अनुभव लालाजींनीं स्वत च घेतला होता. त्यामुळें त्या विषयावर बोलण्याचा त्याच्यापेक्षा अधिक अधिकार कोणाचाच नव्हता त्या प्रसगीच्या आपल्या भाषणात सरकारच्या विसगत धोरणावर लालाजीनी प्रकाश टाकला आहे

श्री. टी. जी. गोस्वामी यानीं मूळ ठरावाला पुढीलप्रमाणें दुरुस्ती सुचविली: "ही धारासभा गव्हर्नर जनरल यांना शिफारस करीत आहे कीं : (अ) चौकशी-शिवाय अटकेंत असलेल्या सर्व राजबंद्यांची ताबडतोब सुटका करण्यांत यावी;

(ब) भारताच्या हिताच्या दृष्टीनें अपायकारक अशा क्रांतिकारक किंवा इतर कारवाया ज्यानीं केल्या असतील किंवा त्या केल्याचा ज्याच्या बाबतींत संशय असेल अशा परदेशात हद्दपार केलेल्या लोकाच्या भारतात परत येण्याच्या मार्गांतील सर्व अडचणी दूर करण्यात याव्या; आणि (क) ज्याच्या बाबतींत पुरेसा पुरावा आहे असें सरकारला वाटते त्याची या देशातील सामान्य कायद्याप्रमाणें चौकशी करण्यात यावी"

हा दुरुस्त ठराव ५३ विरुद्ध ४५ मतानीं संमत झाला ]

## लालाजींचा अधिकार

या ठरावाला पाठिंबा देत असताना मला विश्वास वाटतो कीं, व्यक्तिशः आलेल्या अनुभवामुळें या विषयावर बोलण्याचा माझ्यापेक्षा जास्त अधिकार कोणासहि नसेल कारण या ठरावातील तिन्ही कलमें केव्हाना केव्हा तरी माझ्या बाबतीत लागू करण्यात आली आहेत १९०७ साली १८१८ च्या तिसऱ्या विनिमयानुसार मला देशाबाहेर कारावासात ठेवण्यात आले होते १९२१ साली ज्या गुन्ह्याकरता मला शिक्षा ठोठावण्यात आली तो गुन्हाच नव्हता असें भारत सरकारनें मागाहून जाहीर केलें पुन्हा त्याच साली दुसऱ्या गुन्ह्याकरता मला शिक्षा झाली पण तोही गुन्हा सिद्ध झालेला नव्हता असें सरकारी वकिलानेंच सांगितलें आणि अमेरिकेहून मला ज्यावेळीं स्वदेशी परतावयाचे होते त्यावेळीं परवाना नाकारून मला सरकारने हद्दपार केले अशा रीतीनें ही तीनही कलमें निरनिराळ्या वेळी माझ्या बाबतीत या ना त्या रीतीनें लागू करण्यात आली त्याकडे मी क्रमाक्रमानें वळतो

प्रथम १८१८ च्या तिसऱ्या विनिमयाखाली मला देशाबाहेर डांबण्यात आले त्याबद्दल बोलतो ज्या संशयावरून ही कारवाई करण्यात आली त्याला कोण-

ताही आधार नव्हता गृहखात्याच्या अधिकृत माननीय सदस्यांनी थोडयाच वेळापूर्वी श्री. गोस्वामी याना छातीठोकपणे सांगितले की, हा वटहुकूम काढण्यात कलकत्त्यातील युरोपियन समाज व सरकार याच्यात कोणत्याही तऱ्हेचे सगनमत झालेले नव्हते. मीहि तितक्याच छातीठोकपणे सागतो की, १९०७ साली सैन्याशी सधान बाधल्याच्या माझ्यावर घेण्यात आलेल्या सशयाला तिळमात्रही आधार नव्हता कोणतेही कारण नव्हते आपल्या गुप्त हस्तकानी दिलेल्या बातम्यावरुन मला मोकळे ठेवणे धोक्याचे आहे असे सरकारला वाटले असावे हे मी समजू शकतो **परंतु सरकार आणि न्यायालयें चुकणारच नाहीत, असे नाही.** सरकारमार्फत अशा तऱ्हेने झालेल्या अन्यायाचे परिमार्जन करण्याकरता अशा बाबतीची मधूनमधून फेरतपासणी करणे हाच उत्तम उपाय ठरेल सरकारने गुन्ह्यासबधी घेतलेले कोणतेही निर्णय जरी ते उच्च न्यायालयाने कायम केले असतील तरीही निराधार व चुकीचे असू शकतील कारण अशा बाबतीत सशयिताना आपल्या बचावाची सधि देण्यात येत नाही

## तुरुंगाधिकाऱ्यांचें उद्धट वर्तन

राजबद्याना देण्यात येणाऱ्या वागणुकीसबधी मला काही फारसे सागावयाचे नाही पण तुरुगातील गैरसोयी किंवा कमतरता यापेक्षा तेथील तुरुगाधिकाऱ्याचा अडदाडपणा व उद्धट वर्तन याचाच अधिक वाईट परिणाम होतो असा अडदाडपणा व उद्धट वर्तन याचा मी स्वत अनुभव घेतलेला आहे. समाजात ज्यानी मान्यता मिळवली आहे, विशिष्ट स्थान प्राप्त करून घेतले आहे अशा व्यक्तीनी आपल्या निष्ठेप्रमाणे मातृभूमीसबधी आपले कर्तव्य पार पाडण्याचा प्रयत्न केला कदाचित् त्याचे काही चुकले असेल परतु त्याचा प्रामाणिकपणा आणि शुद्ध हेतु याबद्दल त्याचा सन्मानच केला पाहिजे म्हणून अशा व्यक्तींना जे केवळ त्याच्या योग्यतेप्रमाणे सामान्य सुखसोयीहि पुरविण्याचे नाकार-

तात, एवढेंच नव्हे तर त्याच्याशी अडदाडपणानें वागतात अशा लोकांच्या स्वाधीन करून सरकार क्रांतिकारक चळवळीला पोषक असें वातावरण तयार करत आहे माझ्या वैयक्तिक प्रकरणाबद्दल मला एवढेंच सांगावयाचे आहे

क्रांतिमय चळवळीबद्दल पुष्कळच गोष्टी आपल्या कानावरून आता गेल्या आहेत माझ्या मतें त्यापैकी बऱ्याच गोष्टींचा येथें काही संबंध नाही क्रांति आणि क्रांतिकारक चळवळीमध्यें अनैसर्गिक असे काहीच नाही 'क्रांति' शब्द ऐकला की पुष्कळांची स्थिति एकाद्या बुजऱ्या जनावराप्रमाणें होते माझें तर असें स्पष्ट मत आहे की, क्रांति आणि क्रांतिकारक चळवळीशिवाय या जगात प्रगतिच होणार नाही क्रांति आणि उत्क्रांति या दोन निरनिराळ्या गोष्टी आहेत असें म्हणणें खुळचटपणाचे आहे उत्क्रांतिशिवाय क्रांति त्याचप्रमाणें **क्रांतिशिवाय उत्क्रांति असूच शकत नाहींत** त्या परस्परावलंबी आहेत फरक फक्त गतिमध्येंच आहे फक्त याच आधारावर कधी कधी क्रांति मार्ग आणि उत्क्रांति मार्ग याच्यात भेद मानण्यात येतो दुसरा कोणताहि फरक पूर्णपणें असत्य आहे

## क्रांतिकारक चळवळी

अध्यक्ष महाशय, मला असें सांगावयाचे आहे की, पूर्वीपासून क्रांतिकारक चळवळी या जगात सतत होत आल्या आहेत आजही त्या चालू आहेत आणि पुढें होत राहतील माझ्या एका मित्राच्या विधानाची द्विरुक्ति करून मी म्हणतो की, या पृथ्वीवरील कितीही सुसंस्कृत आणि पुढारलेला देश घेतला तरी ताहि या क्रांतिकारक चळवळीपासून मुक्त नाही ग्रेट ब्रिटनसुद्धा त्यातून सुटलें नाही म्हणून ज्या देशात क्रांतिकारक चळवळी होतात तेथील नागरिक दुष्ट प्रवृत्तीचे आणि असमंजस आहेत असें समजून त्या सर्वांना किंवा त्याच्यापैकी पुष्कळांना शिक्षा करावयास पाहिजे असाच त्याचा अर्थ होत नाही अर्थात् क्रांतिकारकांनी

ध्येय साध्य करण्याकरता योजलेल्या साधनावरूनच अशा क्रांतिकारक चळवळीचे स्वरूप ठरविता येईल आणि या बाबतीत जगातील इतर देशातील लोकाहून भारतीय लोक स्वभावानें काही निराळे आहेत असें नाही ग्रेट ब्रिटन व इतर पाश्चात्य देशात वास्तव्य करण्याची मला संधि मिळाली होती त्यावरून या देशातील जनता इतर देशाच्या मानानें अधिक शीघ्रकोपी व तात्काळ भडकणारी आहे असें मला वाटत नाही वास्तविक असे थोडेच लोक या देशात आहेत अशीच तक्रार ह्यांनी मी तर असें म्हणेन की, भारतीय लोक त्याचा स्वभाव, परंपरा, संस्कृति आणि इतिहास याचा विचार करता अत्यंत मवाळ आणि सहज ताब्यात ठेवता येण्यासारखे आहेत आणि कायद्याचे पालन ते इतक्या तत्परतेने करतात की, या सर्व गोष्टीबद्दल त्याना दोष देण्याऐवजी शाबासकीच द्यावी लागेल त्यानी जर क्रांतिकारक चळवळीचा मार्ग स्वीकारला असेल तर त्याचा अर्थ असा होता की, त्याना आपली गाऱ्हाणी दूर करण्याकरता आणि आपल्या हक्काचे संरक्षण करण्याकरता क्रांतिकारक मार्ग अवलंबण्यास भाग पाडणाऱ्या सरकारचेच काही तरी भयंकर चुकत असावे.

अध्यक्ष महाशय, या बाबतीतही गेली पाच वर्षे या देशात अहिंसेचे वातावरण निर्माण करण्याचा आम्ही प्रयत्न केला आमचा त्या मार्गावर विश्वास असो वा नसो परंतु आमची अशी खात्री झाली होती की, देशाच्या सध्याच्या परिस्थितीत सशस्त्र क्रांतिकारक चळवळ योग्य तर नाहींच पण उलट निश्चितपणें मारकच ठरेल ही गोष्ट शेकडा वेळा आम्ही जाहीर केली आहे तथापि सरकारने सशस्त्र चळवळीचा नि पात करण्याचा प्रयत्न करूनही गेल्या २५ वर्षांत कोणत्या ना कोणत्या स्वरूपात हिंसेचे अस्तित्व जाणवले असून तिचा बीमोड झाला नाही माझी अशी खात्री आहे की, सरकारने कितीही कांटेकोरपणे कायदेशीर बंधने आणली आणि बंदीवानांना त्रासदायक वागणूक देवविली तरीही या चळवळीला कारणीभूत असलेले मूळ प्रश्न सुटल्याशिवाय या

क्रांतिकारक चळवळीचा बीमोड होणार नाही हे स्पष्टपणे लक्षात ठेवले पाहिजे कदाचित् तात्पुरती शांतता दिसेल

सन्माननीय गृहसदस्य यांनी बंगाल प्रकरणाविषयी बोलताना सांगितले की, बंगालच्या वटहुकुमाचा इतका परिणाम झाला आहे की, तो अमलात आल्यापासून एकही घातपाती कृत्य झाले नाही तसे असेल तर, वटहुकुमाखाली कैद केलेल्या लोकांना सोडून देण्याचे तेंच एक पुरेसे कारण आहे जर त्या वटहुकुमाचा हेतु साध्य झाला आहे आणि ता इतका परिणामकारक आहे तर त्या वटहुकुमाखाली स्थानबद्ध केलेल्या सर्वांना सोडून देण्याचे ते एक सबळ कारण आहे परंतु माझ्या सन्माननीय मित्रांना मला सांगावेसे वाटते की, क्रांतिकारक चळवळीच्या मुळाशी असलेली कारणे नष्ट झाल्याशिवाय अशा चळवळी नष्ट होतील अशी कल्पना त्यांनी करून घेऊ नये मुख्य गोष्ट अशी आहे की, या देशातील जनतेची राजकीय हक्कांची मागणी वारंवार वर्षानुवर्षे डावलण्यात येत आहे या जगात स्वातंत्र्या-करता लढा कोणत्या ना कोणत्या मार्गाने सतत चालत आलेला आहे कष्ट सोसण्याची लोकांची तयारी असल्याशिवाय प्रगति होऊ शकत नाही सरका-रने त्याला विरोध करावा हें साहजिकच आहे

## राजकीय गुन्ह्याचा उद्देश

आताच माझ्या मित्रांनी राजकीय गुन्ह्याची व्याख्या सांगितली मीही दुसऱ्या विश्वकोशातून अशी व्याख्या काढून दावेन त्या व्याख्येप्रमाणे राज-कीय गुन्ह्याचा उद्देश हा सर्वांत महत्त्वाचा समजण्यात आलेला असून त्यावरूनच गुन्ह्याचे स्वरूप, गुन्हेगारास द्यावयाची शिक्षा आणि वागणूक ही ठरवावी लागतील कोणत्याही राजकीय गुन्ह्यात या तीन गोष्टींचा विचार अत्यावश्यक आहे फक्त तांत्रिक दृष्ट्या गुन्ह्याचा विचार करून चालणार नाही तर गुन्हा सिद्ध झाल्यावर शिक्षा कोणती द्यावयाची व वागणूक कशा तऱ्हेची द्यावयाची

हे त्या उद्देशावरुन ठरवावें लागेल. आवश्यक तर आणखी पुष्कळ आधार देऊन मी असें दाखवू शकेन की, राजकीय गुन्ह्यांत उद्देश हा फार महत्त्वाचा समजला पाहिजे. *या बाबतीत मी त्यांच्याशी सहमत होऊं शकत नाही.*

## ब्रिटिश पद्धतीनें न्याय द्या

*वस्तुस्थिति अशी* आहे की, ब्रिटिश पद्धति अनुसरणारे देश आणि रशियन किंवा ऑस्ट्रियन पद्धति अंगिकारणारे देश यामध्यें स्पष्ट फरक आहे. आम्ही या सरकारला हेंच मागत आहोंत की, ते ब्रिटिश असल्यामुळें त्यानी ब्रिटिश पद्धति आणि स्वातंत्र्याची ब्रिटिश परपरा याच येथे चालू ठेवाव्यात. ऑस्ट्रियन किंवा झारशाही पद्धति येथे लागू करू नयेत. त्या दोन्हीतील फरक मी स्पष्ट करून सांगतो. इंग्लंड व भारत याना लागू करण्यात आलेल्या कायद्यांतील शब्दयोजना आणि तात्त्विक गोष्टी सारख्या असल्या तरी कायदा लागू करण्याची पद्धत दोन्ही ठिकाणी अगदी निरनिराळी आहे. इंग्लंड क्रांतिकारक चळवळीपासून मुक्त आहे असें कोणी म्हणू शकेल असें मला वाटत नाही. सध्याच *इंग्लंडमध्यें अशी एक* चळवळ सुरू आहे. पण मी असें विचारतो *की, तेथील सरकार ज्याप्रमाणें भारतातील लोकांना वागवितें त्याच प्रमाणें ते इंग्लिश क्रांति*कारकाना वागवितें काय ? कदापिही नाही. त्या दोन्हीत फारच मोठी तफावत आहे. कारण या देशातील जनता जें सहन करत आहे ते तेथील लोक सहन करणार नाहीत. ते स्वतंत्र आहेत. क्रांतिकारकाचा मार्ग ज्याना पसंत नाही असे लोकही तेथें ज्यावेळी विचारस्वातंत्र्यावर घाला घालण्याचा प्रयत्न करण्यात येतो त्यावेळी अशा गोष्टीना कडकडून विरोध करून विचारस्वातंत्र्याचे रक्षण करतात. कम्युनिस्ट तत्वज्ञान किंवा त्याचा प्रसार करणारे लोक याच्याबद्दल ज्याना सहानुभूति वाटत नाही अशा मजूर सरकारनेही ज्यावेळी कम्युनिस्ट पुढाऱ्याना अटक झाली त्यावेळी सरकारच्या कृतीचा निषेध केला. लोकमत आपल्या बाजूचे आहे अशी त्याची खात्री होती.

माझ्या मते ही गोष्ट सत्य आहे कारण ब्रिटिश स्वभावात जर कोणती गोष्ट प्रकर्पाने दिसून येत असेल तर ती म्हणजे मतस्वातत्र्याचे आणि विचारस्वातत्र्याचे प्रेम ही होय आचारस्वातत्र्याच्या बाबतीत सरकारला कायद्याप्रमाणें योजना करावी लागते परतु मत आणि विचारस्वातत्र्य याचे बाळकडूनच इग्लिश माणसाला मिळालेलें असते म्हणूनच स्वाभाविकत असे स्वातत्र्य दडपण्यास ब्रिटिश जनता विरोध करते परतु देशाबाहेर मात्र त्याना असे वाटत असावे की, ब्रिटिश परपरा साम्राज्याचे सरक्षण करू शकणार नाहीत म्हणून साम्राज्यरक्षणाकरता ब्रिटिश पद्धतीत न बसणाऱ्या मार्गाचा अवलब त्याना करावा लागतो आमचे त्याना एवढेंच मागणें आहे की, ब्रिटिश साम्राज्याशी आमचा सलोखा राहावा, आणि आमचे त्याना राज्यकारभारात सहकार्य मिळावें अशी त्याची मन पूर्वक इच्छा असेल तर तिचे प्रतीक म्हणून त्यानी या देशातील राजकीय गुन्हेगाराना वागणूक देताना ब्रिटिश न्यायपद्धति लागू करावी म्हणून ज्या ज्या वेळी सरकार व सरकारचे प्रतिनिधी सहकार्याची हाक देतात त्या त्या वेळी असें सहकार्य देण्यामध्यें असलेल्या अडचणी सरकारला दाखवून देण्याकरता या सभागृहात अशा तऱ्हेचे ठराव आणणें अगदी योग्यच आहे असें मला वाटते या ठरावात नमूद केलेल्या गोष्टीचा ज्या ज्या वेळी सरकारकडून सपूर्ण सहकार्याचे आवाहन करण्यात येईल त्या त्या वेळी टाचण म्हणून उपयोग होईल

जोपर्यंत लोकाना चौकशी केल्याशिवाय डाबून ठेवून कुत्र्यासारखी वागणूक देण्यात येत आहे,जोपर्यंत सुभाषचद्र बोस याच्यासारख्या सुशिक्षित आणि सुसस्कृत अशा मोठमोठ्या व्यक्तीनाही तशीच वागणूक देण्यात येत आहे,तोपर्यंतराष्ट्रीय पक्ष सपूर्णपणें सहकार्य करील अशी अपेक्षा सरकारनें बाळगू नये सशस्त्र शातिभारक चळवळ आम्हाला मान्य नाही, असे आम्ही अत्यत प्रामाणिकपणें कोणताही आडपडदा न ठेवता सागत आहोत सरकारशी पूर्वीपेक्षा अधिक सहकार्य करता येईल असें वातावरण निर्माण व्हावें अशी आमची इच्छा आहे. परतु असें

वातावरण निर्माण होण्याकरता राजकीय कैद्याना देण्यात येणाऱ्या वागणुकीत आणि अशा गुन्ह्याकडे बघण्याच्या दृष्टिकोणात फरक होणे आवश्यक आहे त्यामध्यें आमूलाग्र आणि महत्त्वाचा बदल झाला पाहिजे कोणताही हेत्वारोप न करताही मी म्हणेन की, वातावरणातच असा बदल झाल्याखेरीज सहकार्या-बद्दल हे सर्व बोलणें केवळ मुत्सद्दीपणाचे आहे तें प्रामाणिकपणाचे नाही या राजकीय बद्याच्या आणि हद्दपार केलेल्या लोकाच्या बाबतीत आम्ही केलेली विनति मान्य करून सरकारनें आपल्या हेतूचा प्रामाणिकपणा सिद्ध करावा अशी आमची इच्छा आहे

सरकारला हा ठराव पूर्णपणें मान्य करता येणार नाही हें मी समजू शकतो त्याना सर्व राजबद्याना सोडणें शक्य होणार नाही परतु लोकप्रतिनिधीशी चर्चा करून आपले खरेखुर हृदयपरिवर्तन झाल्याचे दाखविण्याची सरकारला ही एक सधि मिळालेली आहे माझी अशी मागणी आहे की, ज्या लोकाना चौकशी-शिवाय अडकवून ठेवण्यात आलें आहे, आरोपाशिवाय बंद करण्यात आले आहे त्याना एक तर ताबडतोब सोडून द्यावे किंवा त्याची चौकशी तरी करावी ही पद्धत ब्रिटिशाना शोभण्यासारखी नाही २० व्या शतकात कोणत्याही सरकारनें अशा पद्धतीचे समर्थन करणें म्हणजे १५०—२०० वर्षांच्या ब्रिटिश अमला-नतरही भारतात स्वातत्र्याच्या दिशेनें किंवा मानवी स्वभाव उत्कर्षाच्या दृष्टीने कोणतीहि प्रगति झाली नाही असे मान्य करण्यासारखे आहे

## दयेची याचना नाहीं

मला येथें हे स्पष्टच सागितले पाहिजे की, आम्ही दयेची याचना करीत नाही आम्हाला दया किंवा सार्वत्रिक माफी नको या ठरावाच्या रूपानें आम्हाला सरकारच्या असें निदर्शनास आणावयाचे आहे की, त्याना आपला प्रामाणिकपणा सिद्ध करण्याची ही एक सधि आहे सरकारपुढे आपले मागणें

माडीत असताना आम्ही असें दाखवून देत आहोत की, त्याच्या हेतूचा आणि सहकार्याच्या हाकेतील प्रामाणिकपणा सिद्ध करण्याचा हा एक सर्वात सोपा मार्ग आहे अशी दयेची आणि सार्वत्रिक माफीची याचना आम्ही जर केली तर ज्यानी आपल्या सदसद्विवेक बुद्धीप्रमाणें आपले कर्तव्य बजावीत असताना कारावासातील कष्टाचीहि तमा बाळगली नाही अशा व्यक्तीचा घोर अपमान केल्यासारखेंच होईल तेंव्हा त्याच्या वतीनें आम्ही अशी मागणी करीत नाही हे पक्के लक्षात ठेवलें पाहिजे हा ठराव आणण्यात आमचा इतकाच हेतु आहे की त्या रूपाने आमची आणि या सभागृहाची काय मागणी आहे तें सरकारला समजावें व ही जनतेच्या प्रतिनिधीचीच इच्छा आहे हे समजून घेऊन सरकारनें तिचा विचार करावा सरकार मोठया अभिमानानें सागत असते की, त्यानी या देशाला राज्यघटना दिली आहे त्या घटनेप्रमाणें काही मतदारसघ ठरविण्यात आले आहेत अशा मतदार सघातून आम्ही निवडून आलो आहोत सरकारसुद्धा हे मान्य करते की, सद्य परिस्थितीत देशातील लोकमत अजमाविण्याचे हेच सर्वोत्तम साधन आहे तेंव्हा लोकप्रतिनिधि म्हणून आम्ही आमचे मत येथें माडीत आहोत आणि सरकार पक्षाने त्याची अमलबजावणी करावी असे सागत आहोत हा ठराव आणण्यामागें आणि त्याला पाठिंबा देण्यामागें आमची हीच भूमिका आहे

## चुकीचें न्यायदान

अध्यक्ष महाशय, आता न्यायालयानी ज्याना शिक्षा केली आहे अशा व्यक्तीच्या सबधी असलेल्या ठरावाच्या दुसऱ्या भागाकडे मी वळतो त्या बाबतीतही न्यायालयानी दिलेल्या न्यायासबधी फेरविचार आम्हाला करावयाचा नाही तशी आमची इच्छा नाही परतु माझ्या स्वत च्या बाबतीतच मी दाखवून दिल्याप्रमाणें पजाब प्रातीय कांग्रेस कमिटीची ती सभा लोकाना भडक-

विण्याकरताच होती असा ग्रह जिल्हा न्यायाधिकारी , न्यायदानाशी संबंधित असलेले इतर सरकारी अधिकारी व खुद्द सरकारनेहि करून घेतला होता ती सभा सोडून जाण्याबद्दल आम्हाला सांगिण्यात आले आणि तसे करण्यास आम्ही नकार दिल्यामुळे आमच्यावर खटले भरण्यात आले नंतर या प्रकरणात पंजाब सरकारने केलेला कायद्याचा अर्थ चुकीचा ठरवून भारत सरकारने आमच्या सर्वांची शिक्षा रद्द ठरविली परंतु प्रत्यक्ष न घडलेल्या अपराधाबद्दल ज्यांना तुरुंगात कष्ट सहन करावे लागले अशा निरपराधी थोर व्यक्तींच्या बाबतीत दिलगिरीचा एक शब्दहि सरकारने उच्चारला नाही या चुकीच्या न्यायदाना-बाबत त्यांनी कोठेही दिलगिरी व्यक्त केली नाही. अशा निकालामुळे निरपराध व्यक्तींना गैरसोय, मोठा अपमान व खर्च करावा लागला आणि त्यांचे बरेच नुकसान झाले, तरीहि सरकारजवळ दिलगिरीचा एक शब्दहि नव्हता अशा चुकीच्या न्यायदानाची आम्हाला या देशात आता सवयच झाली आहे आता आम्ही असमंजस राहिलो नाही हें सरकारने लक्षात घ्यावे अशी आमची इच्छा आहे तसेंच पाहिलें तर आम्ही केव्हाच असमंजस नव्हतो, पण आतापर्यंत आमचा आवाज बाहेर पडत नव्हता आता हा आवाज बाहेर पडू लागला आहे आणि जोपर्यंत तो बाहेर पडत आहे तोपर्यंत आम्ही बोलत राहणारच तशा बोलण्यापासून आम्हास कोणीहि परावृत्त करू शकणार नाही आम्ही आता सरकारला बजावीत आहोत की, जर न्यायदानातील अशा चुका करून दडप-शाही करण्याचे सरकारने बंद केले नाही तर या देशातील तरुण पिढी क्रांति-कारक मार्गांचा अवलंब केल्याशिवाय राहणार नाही आणि मग मात्र सरकार आम्हाला असे मागू शकणार नाही की, क्रांतिकारक मार्ग स्वीकारल्यामुळे त्या लोकांना तहहयात कारावासात ठेवावयास पाहिजे वातावरणात बदल झाला आहे अशी सरकारची खात्री केव्हा पटेल ?

## राजकीय हेतूने माफी

सार्वत्रिक माफीबद्दल मला थोडें बोलावयाचे आहे सार्वत्रिक माफी दया-बुद्धीनें देण्यात येते या गोष्टीवर माझा विश्वास नाही ही माफी राजकीय हेतूनें

दिली जाते. ज्यावेळी वातावरण निवळून लोकांना आपल्या बाजूने वळविण्यांतच हित आहे असें सरकारला वाटते त्याचवेळी अशी माफी देण्यात येते. जोवर जनता अगदी निश्चल असते आणि ती सरकारवर कसलेंहि दडपण आणून त्याला पेचांत पाडणार नाही असें सरकारला दिसते तोंवर सरकार अशी माफी जाहीर करीत नाही. तेंव्हा सार्वत्रिक माफीमागे दयाबुद्धि नसून राजकीय हेतुच असतात. खरे म्हणजे कोणत्याहि सरकारला दयाबुद्धि दाखविणें शक्यच नसते. कोणत्याहि सरकारला तें जमणार नाही. सरकार आपल्या हितरक्षणासाठी व राजकीय उद्दिष्ट साध्य करण्यासाठी झटत असते. म्हणून न्यायालयाच्या निकालाची फेरतपासणी व्हावी अशी आमची मागणीच नाही. झालेल्या शिक्षाचाहि फेरविचार व्हावा असें आमचे म्हणणें नाही. आमचे फक्त एवढेंच म्हणणें आहे की, पंजाबमध्यें लष्करी अंमल सुरू केल्यामुळें किंवा असहकार आणि अकाली चळवळीत भाग घेणाऱ्या काही जणाच्या बाबतीत घाईघाईनें निकाल देण्यात आल्यामुळें लोकाच्या भावना चेतावल्या जाऊन ते चळवळीसाठी उद्युक्त झाले असतील. अशा वातावरणांत जरी काही शिक्षा योग्य वाटल्या असल्या तरी सध्याच्या राजकीय परिस्थितीत सरकारने त्या शिक्षांचा फेरविचार करून त्या कैद्याना सोडून देण्याची वेळ आली आहे असें आम्हाला वाटतें. ठरावाच्या दुसऱ्या भागाचा फक्त एवढाच अर्थ आहे. *न्यायदान किंवा अमलबजाणी* करणारावर आम्हाला कोणतेहि हेत्वारोप करावयाचे नाहीत. या विधानसभेचे दोन व सरकारचे दोन अशा प्रतिनिधींनीच त्या लोकाना अधिक काल तुरुंगात ठेवावें की काय तें ठरवावें असे आमचे मागणें आहे.

## परवाना नाकारून हद्दपारी

आता मी तिसऱ्या मुद्याकडे वळतो. सन्माननीय गृहसदस्यानी सांगितलें की, कायद्याप्रमाणें सध्या देशाबाहेर असणारापैकी, कोणासही हद्दपार केलें

आहे असें म्हणता येणार नाही काळ्या पाण्याची शिक्षा झालेल्याशिवाय इतराना या देशातील कायद्याप्रमाणे हद्दपार केलेले असें म्हणता येत नाही हें खरे आहे परतु लोकाना हद्दपार करण्याचे अनेकविध मार्ग आहेत उदाहरणार्थ स्वित्झर्लंड, जर्मनी, तुर्कस्तान किंवा अमेरिकेंत असलेल्या माणसाला जर तुम्ही देशात परत येण्याचा परवाना देण्याचे नाकारले तर काळ्यापाण्याची शिक्षा जाहीर न करताच तुम्ही त्याला हद्दपार करीत असता, या लोकाना येथे येण्याची परवानगी देऊन नतर जर त्याची चौकशी केली तर त्याला काही तरी अर्थ राहील पण परवाना नाकारून तुम्ही त्याना देशात येण्याचा मार्ग बद करून टाकता आणि वर सागता की, भारतातील कायद्याप्रमाणें त्याना हद्दपार केलें आहे असें म्हणता येत नाही ही गोष्ट योग्य आहे असे वाटत नाही

## परदेशांतून परतण्याचे परवाने

माझ्या बाबतीत सागावयाचे तर मला काही सरकारनें हद्दपार केलें नव्हते, पण सरकारनें परवाना नाकारल्यामुळें ज्यावेळी भारतात परत येणें मला अशक्य झाले त्यावेळी मी हद्दपारच झाला मला कॉन्स्टॅन्टिनोपल येथें २०–२१ वर्षांचे दोन मुसलमान तरुण भेटले हिजरत चळवळीच्या वेळी ते देशाबाहेर पडले होते त्यानी माझ्याकडे गाऱ्हाणे गाइले की, त्याना नोकरी न मिळाल्यामुळें उपजीविकेचे काहीच साधन नव्हते आणि त्यामुळे त्याची परिस्थिति अत्यत बिकट झाली होती माझ्या सल्ल्यावरून त्यानी तेथल्या वकिलातीकडे परवान्याकरता अर्ज केला पण त्याना परवाने मिळाले नाहीत त्याच्यापैकी एकाकडून अर्ज घेऊन मी तो तेथल्या कामगार विभागाच्या प्रमुखाकडे पाठवला त्या गोष्टीला एक वर्ष झालें तरी त्या बाबतीत मला किंवा त्या अर्जदाराला काहीर उत्तर मिळालें नाही

( अध्यक्ष सभासदानी आपलें भाषण आता लवकर आटपावें )

(**सरअलेक्झाडर मुद्दिमन** (गृहसदस्य). सभासदानी ते प्रकरण माझ्याकडे पाठवले तर मी त्यात चौकशी करीन असे मी त्याना सागू इच्छितो)

आभारी आहे हें मी एक उदाहरण म्हणून सागितले मी लवकरच आटपतो अशीच आणखी प्रकरणें आहेत पण मी आता ती सागत नाही जपान, जर्मनी, अमेरिका आणि आणखी इतर देशात भारतीय लोक गेले असून त्याची परिस्थिति अत्यत बिकट झाली आहे अर्थात् त्याच्यापैकी पुष्कळजण सरकारला येथे नको असतील, काही जण तितकेसे त्रासदायक वाटत नसतील, तर आणखी काहीचा कोणताच दोष नसेल अशा लोकानी जर परवाने मागितले तर ते त्याना देणें हेंच योग्य ठरेल मग ते देताना भारतात परत आल्यावर त्याच्यावर खटले भरले जाणार नाहीत अशी खात्री देता येत नाही अशी जाणीव त्याना दिली तरी हरकत नाही अध्यक्ष महाशय, मला असें सागावेसे वाटते की, कित्याच वेळा कर्तव्य भावनेनें किंवा आपल्या ध्येयाच्या सात्विकपणाच्या अतिरेकी कल्पना बाळगल्यामुळें भारावून जाऊन तरुण लोक काही कृत्ये करून जातात आणि त्याबद्दल त्याना नतर पश्चात्ताप होतो अशाना त्याचे आयुष्य नव्याने सुरू करण्याची सधि देऊन त्याचे जीवन शक्य तितके सुसह्य केले पाहिजे. त्याच्या येथील नातेवाईकाचीहि ते परत यावेत अशी इच्छा आहे त्याच्या विरहामुळें नातेवाइकाना दु ख होत असते आणि ते स्वत तर दु खी आहेतच पुष्कळ जणाची चौकशीला तोड देण्याची तयारी आहे मग येथे येऊन न्यायालयाकडून त्याच्या नशिबाची परीक्षा पहाण्याची सधि त्याना का दिली जात नाही ? जर्मनीतून नुकत्याच परत आलेल्या एका बगाली गृहस्थाच्या बाबतीत घेतलेल्या निर्णयाप्रमाणें सरकार कदाचित् त्याच्यावर खटले भरू नयेत असेंही ठरवील निदान परतण्याचे परवाने देण्याच्या बाबतीत तरी या हद्दपार केलेल्या लोकाना हल्लीपेक्षा अधिक सौम्यतेने वागविलें पाहिजे मला अजून पुष्कळ बोलावयाचे होते पण वेळ सपल्यामुळें मी सभागृहाला ताटकळत ठेवत नाही.

# बंगालमधील राजकीय कैद्यांच्या बाबती-तील कायदा रद्द करण्याबद्दल विधेयक

[ क्रांतिकारक चळवळीची दहशत घेऊन ब्रिटिश सरकारने साप म्हणून भुई धोपटण्याचा प्रकार सुरू केला. १८१८ च्या कुप्रसिद्ध तिसऱ्या विनियमाचा (Regulation III of 1818) आधार घेऊन सरकारने दडपशाही सुरू केली. हा कायदा रद्द करण्याबाबत केंद्रीय विधानसभेत वारंवार मागणी होऊं लागली. अशीच मागणी करणारे एक विधेयक श्री. अमरनाथ दत्त यांनी १२ फेब्रुवारी १९२६ रोजी मांडले. त्याला श्री. के. सी. नियोगी, बिपिनचंद्र पाल, मौलवी मुहंमद याकूब, सी. एस. रंगा अय्यर, लाला लजपतराय आदींनी पाठिंबा दिला.

सरकारच्या वतीने बंगालमधील अधिकृत सदस्य जे. टी. डोनोव्हॅन आणि गृहसदस्य सर अलेक्झांडर मुद्दिमन यांनी या विधेयकाला विरोध केला. जे. टी. डोनोव्हॅन हे आयरिश गृहस्थ होते.

लालाजी स्वतः कसलेले वकील होते. शिक्षा ठरविताना गुन्ह्याचा उद्देश लक्षात घेतला पाहिजे या जगात न्यायदानाबाबत सर्वमान्य असलेल्या तत्वावर त्यांनी आपल्या भाषणात भर दिला. उत्कृष्ट वकिलाचे सर्व गुण या भाषणात आपणास दिसून येतील. ]

अध्यक्ष महाशय, बंगाल सरकारचे प्रतिनिधी असलेल्या सन्माननीय सदस्याचे ( जे. टी. डोनोव्हॅन) त्याच्या प्रभावी भाषणाबद्दल मी अत्यंत आनंदाने अभिनंदन करतो. भाषाशैली आणि बोलण्याची ढब या दृष्टीने ते एक उत्कृष्ट भाषण झाले शिवाय आयरिश लोकांचे वक्तृत्व ज्या गुणामुळे जगप्रसिद्ध झाले आहे त्या विनोदबुद्धीनेही त्यांचे भाषण पुरेपूर भरले होते. परंतु तर्कशुद्धता आणि अर्थपूर्णता याचा मात्र त्यात पूर्ण अभाव होता. नेमके याच गुणामुळे कोणतेही भाषण श्रेष्ठ ठरते मी निरनिराळ्या देशात आयरिश लोकांची भाषणे ऐकली आहेत कायदेमंडळातून आणि इतरत्र अमोघ वक्तृत्वाबद्दल त्यांची ख्याती आहे. परंतु त्यांच्यात एक दोष आहे. ब्रिटिशांच्या नोकरीत शिरताच ते आपले कौशल्य त्यांच्या सेवेला वाहतात. तसे अंत:करणाने ते फार चांगले आहेत परंतु सभोवारच्या निराळ्या परिस्थितीमुळे त्यांची मनोवृत्ती पूर्णपणे बदलून जाते. *अशा मनोवृत्तीच्या अधिकाऱ्यामुळे सरकार काही वेळा* अडचणीत सापडत असेल हे मी चांगले समजू शकतो. या सभागृहातील आमच्या बाजूच्या लोकांचा उद्देश कायदे आणि बायबलात सांगितलेल्या दहा आज्ञा मोडण्याचा आहे इथपासून माझ्या सन्माननीय मित्रांनी आपल्या भाषणाची सुरुवात केली अध्यक्ष महाशय, या सभागृहातीलच नव्हे तर या देशातील लोकांचा त्या दहा आज्ञांशी काहीही संबंध नाही. आमच्यापैकी बहुसंख्य लोकांना त्याबद्दल विशेष आस्था नाही.

(एक सदस्य—नक्कीच. )

(दुसरे सदस्य—लज्जास्पद. )

त्यात लाज वाटण्याचे काहीच कारण नाही. उलट आम्ही अभिमानाने सांगू शकतो की त्या आज्ञा लिहिल्या जाण्याच्या कितीतरी अगोदर त्यांचे सार आम्ही आत्मसात् केले होते. तेव्हा अशा आज्ञा लिहून ठेवण्याची आवश्यकता आम्हाला कधीच भासली नाही. परंतु तशी गरज दुसऱ्या बाजूच्या मित्रांच्या बाय-

बाच्या बाबतीत वाटली आणि म्हणून त्याच्याकरता त्या आज्ञा लिहून ठेवण्यात आल्या त्याच्याकरिता त्या आज्ञा लिहिल्या जाण्याच्या फार पूर्वी आमच्या देशात त्याचे पालन होत होते केवळ कायद्यातच नव्हे तर व्यवहारात त्या त्याच्या अगोदरच आम्ही उतरविल्या होत्या

तेव्हा अशा आज्ञा लिहून ठेवण्याची आम्हाला कधीच गरज भासली नाही आणि आताही तशी गरज नाही कायदे मोडण्याचाही आमचा उद्देश नाही **कारण प्राप्त परिस्थितीत आम्हाला कायदे करण्याचे किंवा ते मोडण्याचे सामर्थ्य नाही.** येथील जनतेच्या भावना मांडण्याचे फक्त आमच्या हातात आहे आणि कोणी कितीही अडचणी आणल्या तरी ते कार्य आम्हाला निष्ठेने केले पाहिजे म्हणून सन्माननीय सभासदाच्या भाषणातील त्या भागाकडे दुर्लक्ष करणेच माझ्या मते योग्य ठरेल

## सरकारी नोकरीमुळें मनोवृत्तींत बदल

नतर माझ्या विद्वान मित्रानी ज्याच्या पायाशी बसून आमच्यापैकी पुष्कळानी आपले राजकारणातील धडे गिरविले अशा बगालचे प्रतिनिधि असलेल्या **कै. सर सुरेंदनाथ बानर्जी** याचा उल्लेख केला अध्यक्ष महाशय, १९०५, १९०७ आणि १९०९ साली ज्यावेळी बगालमध्ये ८ जणाना हद्दपार करण्यात आले, त्यावेळी **सर सुरेंदनाथ बानर्जी** बगालचे प्रतिनिधी होते, हे मी मान्य करतो १९०७ साली आणि पुन्हा १९०९ साली ज्यावेळी त्यानी शक्य तितक्या कडक भाषेत या हद्दपारीचा धिक्कार केला, त्यावेळी ते बगाली जनतेच्या भावनाचे खरे प्रतिनिधी होते त्याच्या आचरणासबधी टीकेचा एक शब्दही मी कधी बोलणार नाही पण परिस्थिति बदलली म्हणजे मतामध्येही फरक पडतो आणि असा फरक कधी कधी खेदजनक वाटतो लोकप्रतिनिधी म्हणून ज्या गोष्टीचा सर सुरेंद्रनाथ बानर्जी यानी धिक्कार केला, त्याच गोष्टी पुढे सरकारी

नोकर म्हणून त्याना अमलात आणाव्या लागल्या त्याच्या मतात जो फरक पडला त्याचे कारण म्हणजे सरकारी नोकरी हे होते सरकारी नोकरीत शिरल्यावर लोकाचा आवाज उठविण्याचे कार्य त्याच्याकडून होत नव्हते हीच गोष्ट त्याच्या निवडणुकीत झालेल्या पराभवाने सिद्ध झाली असे मी म्हटल्यास त्याच्यावर मी अनुचित टीका करीत आहे असे म्हणता येणार नाही त्यावेळी बगालच्या जनतेचा आवाज उठवण्याचे खरे काम **सुरेन्द्रनाथ बानर्जी** करीत नव्हते,तर १८१८ चा तिसरा विनियम (Regulation) आणि बगालमध्ये काढण्यात आलेला वट हुकूम याचा ज्यानी तीव्र शब्दात धिक्कार केला असे दुसरेच एक बगाली थोर पुरुष ते कार्य करीत होते अध्यक्ष महाशय, फक्त सरकारी नोकर सोडून १८१८ चा तिसरा विनियम किंवा तो वटहुकूम याना पाठिंबा देणाऱ्या सामान्य किंवा प्रतिष्ठित व्यक्ती मला तरी अजून कोणी आढळल्या नाहीत

अध्यक्ष महाशय १८१८ चा तिसरा विनियम सबध भारताला, निदान सपूर्ण उत्तर भारताला लागू असून बगालमध्ये असलेली परिस्थितीच सर्व देशभर आहे असा सन्माननीय सभासदाच्या बोलण्याचा आशय दिसला तो सर्व भारताला लागू आहेच पण उत्तर भारताला तर तो नक्कीच लागू आहे असे मला वाटते त्या विनियमाबद्दल बगालखेरीज देशाच्या इतर भागातील लोकानाही काही सागावयाचे असले पाहिजे म्हणून बगालमधील परिस्थितीच्या माहितीनुसार त्यानी माडलेल्या मतावरून कायद्यात हा विनियम कायम ठेवावा असे म्हणणे सयुक्तिक नाही बगालमधील विशिष्ट परिस्थितीनुरूप सरकारला तेथे एक वटहुकूम काढावा लागला आहे या क्षणी आपणाला त्याचा विचार करावयाचा नाही आपल्याला फक्त १८१८ च्या तिसऱ्या विनियमाचा विचार करावयाचा आहे बगालविषयीच्या आपल्या प्रेमाच्या भरात माझ्या सन्माननीय मित्राना युरोप आणि अमेरिकेच्या इतिहासाचा आणि सस्कृतीचा विसर पडलेला दिसतो ही गोष्ट थोडी चमत्कारिक आहे त्याचे असे म्हणणे आहे की।

सुसंस्कृत अथवा मागासलेले असे कोणतेही सरकार असले तरी राज्यकारभाराच्या आवश्यकतेनुसार त्याना अशा तऱ्हेचे कायदे करणे भाग पडते माझ्या मित्राचे हे विधान थोडे साहसाचेच आहे मला तर असे वाटते की, अशा तऱ्हेच्या कायद्याची आवश्यकता न भासणे हीच सरकारच्या सुसंस्कृतपणाची आणि आपल्या प्रजेवर असलेल्या नैतिक आणि न्याय्य अधिकाराची सर्वात मोठी कसोटी आहे

## न्यायालयीन चौकशीचा हक्क

मी माझ्या मित्राना असे आव्हान देतो की, लोकाच्या न्यायालयीन चौकशीच्या हक्कावर गदा आणल्यावाचून ज्या ठिकाणी अशा तऱ्हेचा कायदा अस्तित्वात आहे असा एक तरी सुसंस्कृत देश त्यानी मला दाखवावा अत्यंत अल्प काळ असा कायदा अस्तित्वात असलेले काही देश मला माहीत आहेत. परंतु त्या ठिकाणीही लोकाचा न्यायालयीन चौकशीचा हक्क हिरावून घेण्यात आला नव्हता त्याचप्रमाणे तेथील न्यायालयानाही कोणत्या परिस्थितीत असे कायदे लागू करावेत त्याबद्दल पूर्ण मुभा होती सुसंस्कृत देशातही अशाततेच्या वेळी अशा तऱ्हेचे कायदे संमत केले जातात हे मला माहीत आहे परंतु ज्या ठिकाणी सतत १५० वर्षे अशा तऱ्हेचा कायदा अस्तित्वात असून तो रद्द करण्याचा किंवा सुधारण्याचा जेथे प्रयत्नही केला जात नाही, असा एक तरी देश ते मला दाखवून देतील काय ? मी असे खात्रीपूर्वक सागतो की, या पृथ्वीच्या पाठीवर असा एकही सुसंस्कृत देश नाही एकतर या कसोटीप्रमाणे आम्ही इतरापेक्षा अधिक सुसंस्कृत असलो पाहिजे अथवा माझ्या मित्राचे समकालीन आणि पूर्वीच्या इतिहासाचे ज्ञान अचूक नसले पाहिजे संयुक्त संस्थानातील अध्यक्षाचा रोष करण्याचे वारवार प्रयत्न करण्यात येतात याची त्याना जाणीव नाही काय ? जिचा युरोप आणि अमेरिकेत सर्वत्र प्रसार झाला आहे अशा सिंडी-

कार्टिस्ट चळवळीबद्दल त्यानी कधी ऐकले नाही काय ? क्रांतिकारक चळवळी-पासून मुक्त असा अमेरिकेत काय किंवा युरोपात काय एकहि देश नाही हे खरे नव्हे काय ? कोणत्याहि सुसंस्कृत देशात अशा चळवळी दडपण्याचा कधी प्रयत्न करण्यात आला आहे काय ? अशा तऱ्हेचा प्रयत्न करण्यात आल्याचे एकही उदाहरण नाही असे माझे म्हणणे आहे अध्यक्ष महाशय, माझ्या परीने मी या विषयाचा अभ्यास केला आहे आणि त्यामुळे या देशात ज्या तऱ्हेचे दडप-शाहीचे प्रयत्न करण्यात आले आहेत अशा तऱ्हेची दुसरी उदाहरणे मला कोठेही आढळली नाहीत या देशात शांततेच्या कालातही १८१८ च्या तिसऱ्या विनियमाच्या भरीस एक असाधारण वटहुकुमही काढण्यात आला आहे आणि त्याच्या सहाय्याने लोकाना न्यायालयीन चौकशीचा हक्क शांतता कालातही नाकारण्यात आला आहे **युद्धकाळात किंवा अशांततेच्या वेळी अशा तऱ्हेची उपाययोजना करण्यात आली तर ती समजण्यासारखी आहे** परंतु अशा तऱ्हेचा जुलमी कायदा सतत शांततेच्या काळातही या देशात लागू करण्यात येणार आहे काय ? त्याचा कधी फेरविचार करण्यात येत नाही किंवा तो काही काल रहित करण्यात येत नाही डेमॉक्लिसच्या टांगत्या तलवारीप्रमाणे आपल्या हक्काची मागणी करणाऱ्या लोकाना त्याची सतत भीती दाखविण्यात येत असते

## क्रांतिकारक चळवळींचा उगम

सन्माननीय सभासदानी असे विधान केले की, बंगालमधील परिस्थितीत हा कायदा लागू करण्याशिवाय गत्यतर नव्हते एका परिस्थितीच्या दबावामुळे दुसरी परिस्थिती निर्माण झाली आहे याचा माझ्या मित्राना विसर पडलेला दिसतो त्याच्या पक्षाच्या जुलमीपणा आणि दडपशाही याच गोष्टी अशा क्रांति-कारक चळवळीच्या मुळाशी असतात, असे लोक म्हणतात त्याच्या मताप्रमाणे हे जुलूम नसतील, त्याना यात दडपशाही आहे असे वाटत नसेल पण आम्हाला मात्र नक्की असे वाटते की मुख्यत अशा तऱ्हेचे जुलमी कायदे शांतता काळातही

लागू केल्यामुळे क्रांतिकारक चळवळी अस्तित्वात येतात या क्रांतिकारक चळवळीच्या मुळाशी आणखीही काही कारणे असतात. त्याचा लोकांच्या जीवनाशी संबध असतो त्याच्या जीवनातील अशा गोष्टीत फरक करण्याचा सरकारने कधी प्रयत्न केला आहे काय ? स्वत चे सरकार स्थापन करण्यापूर्वी त्याच्या देशालाही अशाच हालअपेष्टातून मार्ग काढावा लागला याचा माझ्या मित्राना विसर पडला काय ? ते म्हणतात की, तेथें सरकार स्थापन झाल्याबरोबर त्यालाही १८१८ च्या बगाल रेग्युलेशन सारखाच कायदा करावा लागला परतु त्याच्या सरकारला तो कायदा चालू ठेवण्याकरता दर वर्षी तेथल्या लोकसभेची समती घ्यावी लागते हे मात्र त्यानी सागितले नाही तो सतत वर्षानुवर्षे चालत राहात नाही परत परत समत करून घेण्याकरता तो लोकसभेपुढे आणावा लागतो जे सरकार शातता कालातही अशा कायद्याचा आधार घेते त्याला माझ्या मते सुसस्कृत म्हणवून घेण्याचा अधिकार नाही ज्या देशातील सरकारचा आपल्या सत्तेवरील आणि जनतेवर असलेल्या आपल्या नैतिक आणि न्याय्य अधिकारावरील विश्वास ढळला आहे तेथेंच फक्त हे शक्य आहे आपली प्रतिष्ठा राखण्यासाठी आणि शातता व सुव्यवस्था ठेवण्यासाठी ज्याला अशा तऱ्हेच्या कायद्याचा आधार घ्यावा लागला असे कोणतेहि सामर्थ्यशाली आणि सुसस्कृत सरकार जगाच्या इतिहासात सापडेल असे मला वाटत नाही सरकारच्या दुर्बलतेची ही कबुलीच आहे आणि ती त्याला शोभण्यासारखी नाही असे मला वाटते हा कायदा रद्द करावा अशी मागणी करण्यात इग्लडचा उच्च नावलौकिक कायम रहावा असाच आमचा हेतु आहे या देशात असलेल्या इग्रजाचे स्वास्थ्य नाहीसे व्हावे अशी आमची इच्छा नाही भारतात अशा तऱ्हेचा कायदा अस्तित्वात असावा आणि तो रद्द किंवा स्थगित करण्याची किंचितही इच्छा दर्शविली जाऊ नये ही गोष्ट ग्रेट ब्रिटनच्या दृष्टीने लाछनास्पद आहे असे म्हटल्याबद्दल माझे मित्र मला क्षमा करतील अशी आशा करतो

मला वाटते **श्री. अमरनाथ दत्त** यानी उल्लेख केला त्यावेळी **बाबू अश्विनी-कुमार दत्त** आणि **कृष्णकुमार मित्र** याना हद्दपार करण्यात आले होते त्या हद्दपारीचे खरे कारण सरकारने अगदी नुकतेच जाहीर केले बगाल सरकारला मान खाली घालावयास लागावी अशा तऱ्हेच्या त्याच्या दुर्बलतेची ती एक कबुलीच नाही काय ? **बाबू अश्विनीकुमार दत्त आणि कृष्णकुमार मित्र** यानी कोणत्याही क्रातिकारक चळवळीत भाग घेतला नव्हता इतकेच नव्हे तर अशा तऱ्हेचा भाग घेतल्याचा त्याच्यावर सशयहि नव्हता परतु बगालमध्ये शातता आणि सुरक्षितता रहावी म्हणून त्याना दूर करण्यात आले, अशी कबुली देण्यात आली हे सर्व कशाकरता करण्यात आले असे विचाराल तर त्यानी स्वदेशीच्या चळवळीत पुढाकार घेतला म्हणून, हेच त्याचे उत्तर त्यानी कोणताही गुन्हा केला नव्हता परतु ब्रिटिश सरकारला स्वदेशी चळवळ हाणून पाडावयाची होती आणि त्याना हद्दपार करून दूर सारल्याशिवाय हे शक्य झाले नसते हे उद्दिष्ट साध्य करण्याकरिताच बगाल सरकारला १८१८ च्या तिसऱ्या विनियमाचा आधार घ्यावा लागला कोणत्याही सरकारच्या नावलौकिकाला शोभण्यासारखी ही गोष्ट होती असे मला वाटत नाही कायद्याचा दुरुपयोग तो रद्द करण्याचे कारण होऊ शकत नाही असे माझ्या मित्रानी परवा सागितले त्याला माझे उत्तर असे आहे की, **एखाद्या कायद्याचा अशा रीतीने वारवार दुरुपयोग होत असेल तर तो कायदाच दोषपूर्ण असला पाहिजे** आणि तो अयोग्य असल्यामुळे त्याचे अस्तित्व सपुष्टात आणले पाहिजे १८१८ च्या तिसऱ्या विनियमासारखा ज्याचा दुरुपयोग करता येणार नाही असेच कायदे फक्त अस्तित्वात असले पाहिजेत

## लंगडी सबब

नेहमीच्या न्यायालयापुढे या क्रातिकारकाची चौकशी करता येत नाही कारण अशा चौकशीत साक्षी देणाराचा खून होण्याची भीति असते असे साग-

सशस्त्र उठावात भाग घेतलेल्याचा गुन्हा सिद्ध करण्याकरता पुरावा मिळविण्याच्या बाबतीतही अडचणीचा पाढा सन्माननीय सभासदानी परत एकदा वाचून दाखवला अशा दडपण आणणाऱ्या कायद्याचा विचार करण्याकरता नेमलेल्या समितीने या सर्व गोष्टींचा पूर्ण विचार केला होता. सरहद्द प्रांताशिवाय देशाच्या इतर सर्व भागात हा कायदा रद्द केला पाहिजे असे निःसंदिग्ध अनुमान त्या समितीने काढले आहे देशाच्या दुसऱ्या कोणत्याही भागात अशा कायद्याच्या अस्तित्वाची जरूरी नाही असे त्यांचे मत होते म्हणून अध्यक्ष महाशय, येथे येऊन हे सरकार टिकण्यासाठी असा कायदा आवश्यक आहे असे म्हणण्याची वेळ आता राहिली आहे असे मला वाटत नाही १७० वर्षांच्या अमलानंतरही या देशातील ब्रिटिश सरकारला आपली न्यायालयें आणि शांतता व सुव्यवस्था राखण्याच्या बाबतीतील नैतिक प्रतिष्ठा यावर विश्वास ठेवणे धोक्याचे वाटण्याइतके हे सरकार निर्बल झाले आहे काय ? आणि १८१८ च्या तिसऱ्या विनियमाखाली ज्या मूठभर लोकांना वारंवार पकडण्यात येते त्यांच्यामुळे या देशाची शांतता आणि सुव्यवस्था सतत धोक्यात येत असते असे त्यांना म्हणावयाचे आहे काय ?

## सत्तेची धुंदी

अध्यक्ष महाशय, निरंकुश सत्तेची धुंदी चढल्यामुळेच अशा तऱ्हेचा कायदा सरकारने चालू ठेवला असावा एरवी त्याची मुळीच आवश्यकता नव्हती अमर्याद आणि अनियंत्रित सत्तेचा सतत वापर केल्यामुळे सरकारची मनोवृत्ती अशी बनली की, त्याला असे कायदे करणे भाग पडले ज्या ज्या वेळी आत्मविश्वासपूर्वक न्यायालयात जाणे सरकारला शक्य नसते त्या त्या वेळी ते अशी उपाययोजना करते १९०९ साली केलेल्या हद्दपारीच्या बाबतीत नुकत्याच काही गोष्टी उजेडात आल्या आहेत त्याचा माझे मित्र श्री. नियोगी आणि

मला वाटते श्री. अमरनाथ दत्त यानी उल्लेख केला. त्यावेळी बाबू अश्विनी-कुमार दत्त आणि कृष्णकुमार मित्र याना हद्दपार करण्यात आले होते. त्या हद्दपारीचे नवे वारण सरकारने अगदी नुकतेच जाहीर केले. बंगाल सरकारला मान खाली घालावयास लागावी अशा तऱ्हेच्या त्याच्या दुर्बलतेची ती एक कबुलीच नाही काय ? बाबू अश्विनीकुमार दत्त आणि कृष्णकुमार मित्र यानी कोणत्याही क्रांतिकारक चळवळीत भाग घेतला नव्हता. इतकेच नव्हे तर अशा तऱ्हेचा भाग घेतल्याचा त्याच्यावर संशयहि नव्हता. परंतु बंगालमध्ये शांतता आणि सुरक्षितता रहावी म्हणून त्याना दूर करण्यांत आले, अशी कबुली देण्यात आली. हे सर्व कशाकरतां करण्यात आले असे विचाराल तर त्यानी स्वदेशीच्या चळवळीत पुढाकार घेतला म्हणून, हेंच त्याचे उत्तर. त्यानी कोणताही गुन्हा केला नव्हता. परंतु ब्रिटिश सरकारला स्वदेशी चळवळ हाणून पाडावयाची होती. आणि त्याना हद्दपार करून दूर सारल्याशिवाय हे शक्य झाले नसते हे उद्दिष्ट साध्य करण्याकरिताच बंगाल सरकारला १८१८ च्या तिसऱ्या विनियमाचा आधार घ्यावा लागला. कोणत्याही सरकारच्या नावलौकिकाला शोभण्यासारखी ही गोष्ट होती असे मला वाटत नाही. कायद्याचा दुरुपयोग तो रद्द करण्याचे वारण होऊ शकत नाही असे माझ्या मित्रानी परवा सांगितले. त्याला माझे उत्तर असे आहे की, एखाद्या कायद्याचा अशा रीतीने वारंवार दुरुपयोग होत असेल तर तो कायदाच दोषपूर्ण असला पाहिजे आणि तो अयोग्य असल्यामुळे त्याचे अस्तित्व संपुष्टात आणले पाहिजे. १८१८ च्या तिसऱ्या विनियमासारखा ज्याचा दुरुपयोग करतां येणार नाही असेच कायदे फक्त अस्तित्वात असले पाहिजेत.

## लंगडी सबब

नेहमीच्या न्यायालयापुढे या क्रांतिकारकांची चौकशी करता येत नाही. कारण अशा चौकशीत साक्षी देणाराचा खून होण्याची भीति असते असे सांग-

ण्यात आले. पण आपणाला माहीत आहे की ही एक लगडी सबव आहे. असा धोका पत्करुनही कटासबधी आरोपाची बगालमध्ये चौकशी चालू आहेच त्याशिवाय बगालच्या वटहुकुमाखाली लोकाना तुरुगात टाकण्यात येत आहेच १८१८च्या तिसऱ्या विनियमान्वये फक्त थोड्याच जणाना मार्गातून दूर करण्यात आले आहे मग याचा अर्थ असा करायचा काय की, फक्त त्याच्याच बाबतीत पुरावा माडणे धोक्याचे आहे आणि इतराच्या बाबतीत तसे करणे पूर्ण सुरक्षितपणाचे होते व आहे ? अशा विधानात काही तथ्य नाही असे मला वाटते १८१८ चा तिसरा विनियम काही जणाच्या बाबतीत लागू करण्याचे कारण साक्षीदाराच्या जीविताला धोका आहे हे नसून त्याच्या बाबतीत कोणतेही न्यायालय मान्य करील असा पुरावाच नाही हे आहे कायद्याप्रमाणे हे प्रस्थापित झाले आहे असे ज्याच्या बाबतीत वारवार सागण्यात येते असे हे सरकार लोकाना त्याच्यावरील आरोपाची यत्किंचितही कल्पना न देता ते बेसावध असताना देशाबाहेर नेऊन ठेवते दुसऱ्या काही जणाची ते चौकशी करते पण जेव्हा अशा चौकशीतून काही निष्पन्न होत नाही आणि आपल्या या पद्धतीने अशा लोकाचे गुन्हे सिद्ध होत नाहीत असे दिसून येते तेव्हा १८१८ चा तिसरा विनियम लागू करून त्याना तुरुगात टाकण्यात येते सुसस्कृत म्हणवून घेणाऱ्या सरकारला हे शोभण्यासारखे आहे काय ? लोकाचे आपल्या विषयीचे प्रेम आणि आसक्ति यावर राज्य करण्याचा आपला अधिकार आधारलेला आहे असे सागणाऱ्या या सरकारला हे शोभण्यासारखे नाही आमच्या जागी ते असते तर तशाच परिस्थितीत त्याना काय वाटले असते याची त्यानी कल्पना करावी अशी मी सरकारी पक्षाच्या सन्माननीय सदस्याना विनति करतो आणि मगच त्यानी परिस्थितीचे मूल्यमापन करून आमच्या बाबतीत न्याय करावा जे तरुण भावनेच्या भरात करू नये अशा काही गोष्टी करून जातात

*(अलेक्झांडर मुड्डिमन—या गोष्टी योग्य आहेत काय ? )*

त्या योग्य नाहीत असेच मी सागत होतो पण त्याच्या बाबतीत तुम्ही करीत आहात त्याप्रकारे न्याय करणेही योग्य नाही घोर निराशेच्या वातावरणाचा त्याच्या मनावर वाईट परिणाम झाला हे आपण विसरता कामा नये त्याच्यापैकी पुष्कळ जणाना उपजीविकेचे चागले साधन मिळविण्यात हरेक प्रकारे प्रयत्न करूनही अपयश आल्यामुळे ते क्रातिकारक बनले, त्यानतर त्याची समतोल वृत्ती नाहीशी झाली आणि त्यानी अयोग्य मार्गाचा अवलब केला त्याचे वर्तन योग्य आहे असे मी म्हणत नाही त्यानी त्या मार्गाने जाऊ नये असेच मला वाटते हे योग्य नाही असेच मी त्याना सागत आलो आहे पण जरी त्यानी माझा सल्ला ऐकला नाही तरी त्याच्या बाबतीत इतकी कडक शिक्षा करणे मला उचित वाटत नाही

## हिंदु–मुसलमानांचे एकमत

माझ्या मित्रानी दुसऱ्या एका मुद्याचा उल्लेख केला तो सर अबदुर रहिम याच्या भाषणातील मुसलमान लोकाच्या बद्दलचा होता सर अबदुर रहिम यानी आपली बाजू माडीत असताना त्याना योग्य वाटले असे विधान केले परतु आपल्या धर्मबाधवाच्या देशप्रेमावर ठपका ठेवण्याचा त्याचा उद्देश नव्हता परकीय सत्तेत होणारा घोर अपमान, जुलमी कायद्याची अमलबजावणी ही शल्ये मुसलमान लोकाना खटकत नाहीत या गोष्टीवर माझा विश्वास नाही अध्यक्ष महाशय, अशा तऱ्हेचे विधान हे मुसलमानाच्या देशप्रेमाला कालिमा लावणारे असून या सभागृहातील माझे मुसलमान मित्र ते खोडून काढतील अशी आशा मी करतो सर अबदुर रहिम याच्या बोलण्याचा तसा उद्देश होता असे मला वाटत नाही आपली बाजू माडीत असताना त्या बाजूच्या एखाद्या मित्राने अशा तऱ्हेचे विधान करणे म्हणजे घाणेरडे डावपेच खेळण्यासारखेच आहे ( असे बोलण्याबद्दल त्यानी मला क्षमा करावी ) दुसऱ्या कोणत्याही

अशी खात्री त्यानी देऊ नये मुसलमान लोकाचा आपल्या मनावर जास्त ताबा असणेही शक्य आहे, असें असेल तर त्याचे अभिनदन केलें पाहिजे किंवा ज्या परिस्थितीत सापडल्यामुळें हिंदु तरुणाची तशा तऱ्हेची अपेक्षा मनोवृत्ति बनली त्यापेक्षा मुसलमानाच्या बाबतीत कदाचित् निराळी परिस्थिति असण्याचीही शक्यता आहे परतु त्याच मार्गानें जाण्यावाचून गत्यतर नाही अशी परिस्थिती निर्माण होण्याची त्याच्याही बाबतीत वेळ येत आहे ती येऊ नये अशीच माझी इच्छा आहे

## रोलट समिति

रोलट समितीच्या अहवालाकडे मी सभागृहाचे लक्ष वेधू इच्छितो बगाल-मधील क्रातिकारक चळवळीच्या मुळाशी सुशिक्षित वर्गाची बेरोजगारी हीच आहे, असें त्यात म्हटले आहे त्या प्रातातील मुसलमान एवढ्या मोठ्या प्रमाणा-वर सुशिक्षित नसल्यामुळें ते या बेरोजगारीच्या तावडीत सापडत नाहीत आणि त्यामुळें ते अशा चळवळीत भाग घेत नाहीत हिंदु लोक अधिक प्रमाणात सुशि-क्षित असल्यामुळें ते बेकार राहिले आहेत म्हणूनच तुम्हाला क्रातिकारक चळ-वळीत मुसलमानापेक्षा हिंदु लोक अधिक दिसून येतात अशा तऱ्हेच्या वादा-मुळे या किंवा त्या कोणत्याही बाजूला जास्त बळकटी येते असे मला वाटत नाही

ज्यावेळी सरकारला असाधारण अधिकाराची आवश्यकता भासते असे काही प्रसग असतात हें मला मान्य आहे, परतु वर्षानुवर्षे सदा सर्व काल अशा तऱ्हेच्या अधिकाराचा उपयोग केला जावा अशी या देशातील परिस्थिति आहे या गोष्टी-वर माझा विश्वास बसू शकत नाही ज्या कायद्यामुळें असा अधिकार सरकारला मिळाला आहे तो कायदा सतत अस्तित्वात आहेच ह्या गोष्टीशी मी सहमत होऊ शकत नाही परतु सरकारला असा अधिकार हवाच असेल तर त्यानी

रीतीने अशा कृत्याला सबोधता येणार नाही. ज्या गोष्टीबाबत हिंदु आणि मुसलमान यांचे पूर्णतया एकमत आहे अशा बाबतीत हा झगडा निर्माण करण्याचा जाणून बुजून केलेला प्रयत्न आहे. या बाबतीत हिंदु आणि मुसलमानांत कोणताही मतभेद नाही अशी माझी खात्री आहे. काही हिंदु आणि मुसलमान आमच्या विरुद्ध मत देत असतील ते नेहमीच तसे करतात, पण अशा वागण्याची कारणें मात्र निराळी आहेत. त्याना १८१८ चा तिसरा विनियम पसंत आहे असा त्याचा अर्थ नाही. आपल्या विधानाबद्दल इतकी खात्री त्यानी बाळगू नये असे मी त्याना सागू इच्छितो बगालमध्ये ज्या मुसलमान सद्‌गृहस्थाना अटक करण्यात आली होती त्याचे नाव श्री. नियोगी यानी सांगितले. पजाबमधील असेच एक प्रकरण मला माहीत आहे ते गृहस्थ एम्. ए. असून त्याचे नाव गुलाम हुसेन असे होते. ज्यावेळी मी लाहोरच्या मध्यवर्ती कारागृहात होतो त्याच वेळी १८१८ च्या तिसऱ्या विनियमाखाली त्यांनाही तेथेच टाकण्यात आले होते. ते तेथें असताना मोठमोठे गुप्त पोलिस अधिकारी वारवार त्याना भेटून त्याच्याशी बोलत असत. नंतर त्याची सुटका करण्यात आली

कोणत्याही तऱ्हेची चौकशी किंवा गुन्ह्याचा तपास करण्याकरता ह्या कायद्याखाली कोणालाही स्थानबद्ध करणे समर्थनीय ठरत नाही. ज्यावेळी देशातील शातता धोक्यात येत असेल किंवा क्षोभ झाला असेल अशाच वेळी तो कायदा लागू करणे समर्थनीय ठरेल. त्या कायद्याखाली चौकशी किंवा गुन्ह्याचा तपास करण्याकरता कोणालाही अटक करता येत नाही. कारण बराच काल तुरुगात खितपत पडल्यानतर मग ज्यावेळी अशा लोकाच्या विरद्ध कोणताही आरोप सिद्ध होण्यासारखा नाही असे तुम्हास आढळून येते त्यावेळी तुम्ही त्याना सोडून देता. माझ्या मनें माझ्या मित्रानी मुसलमानाच्या बाबतीत जी विधानें केली ती सर्व तितकीशी बरोबर नाहीत. मुसलमान लोकाची मनोवृत्ति तशीच येथून पुढेही कायम राहील

अशी खात्री त्यानी देऊ नये मुसलमान लोकाचा आपल्या मनावर जास्त ताबा असणेही शक्य आहे, असें असेल तर त्याचे अभिनदन केलें पाहिजे किंवा ज्या परिस्थितीत सापडल्यामुळें हिंदु तरुणाची तशा तऱ्हेची अपेशी मनोवृत्ति बनली त्यापेक्षा मुसलमानाच्या बाबतीत कदाचित् निराळी परिस्थिति असण्याचीही शक्यता आहे परतु त्याच मार्गानें जाण्यावाचून गत्यतर नाही अशी परिस्थिती निर्माण होण्याची त्याच्याही बाबतीत वेळ येत आहे ती येऊ नये अशीच माझी इच्छा आहे

## रोलट समिति

रोलट समितीच्या अहवालाकडे मी सभागृहाचे लक्ष वेधू इच्छितो बगाल-मधील क्रातिकारक चळवळीच्या मुळाशी सुशिक्षित वर्गाची बेरोजगारी हीच आहे, असें त्यात म्हटले आहे त्या प्रातातील मुसलमान एवढ्या मोठ्या प्रमाणा-वर सुशिक्षित नसल्यामुळें ते या बेरोजगारीच्या तावडीत सापडत नाहीत आणि त्यामुळें ते अशा चळवळीत भाग घेत नाहीत हिंदु लोक अधिक प्रमाणात सुशि-क्षित असल्यामुळें ते बेकार राहिले आहेत म्हणूनच तुम्हाला क्रातिकारक चळ-वळीत मुसलमानापेक्षा हिंदु लोक अधिक दिसून येतात अशा तऱ्हेच्या वादा-मुळे या किंवा त्या कोणत्याही बाजूला जास्त वळकटी येते असे मला वाटत नाही

ज्यावेळी सरकारला असाधारण अधिकाराची आवश्यकता भासते असे काही प्रसग असतात हें मला मान्य आहे, परतु वर्षानुवर्षे सदा सर्व काल अशा तऱ्हेच्या अधिकाराचा उपयोग केला जावा अशी या देशातील परिस्थिति आहे या गोष्टी-वर माझा विश्वास बसू शकत नाही ज्या कायद्यामुळें असा अधिकार सरकारला मिळाला आहे तो कायदा सतत अस्तित्वात आहेच ह्या गोष्टीशी मी सहमत होऊ शकत नाही परतु सरकारला असा अधिकार हवाच असेल तर त्यानी

त्याप्रमाणें इतर कायदे तरी बदलून घेतले पाहिजेत म्हणजे न्यायालयात जाऊन आम्हाला त्याबद्दल दाद तरी मागता येईल असे केल्यास तें काही अशी समजस-पणाचें व योग्य होईल परंतु इतर कायदे तुम्ही बदलत नाही पण फौजदारी गुन्ह्यासबधीच्या कायद्याखाली झालेल्या अन्यायाबद्दल मात्र आम्हाला दाद मागता येणार नाही अशी परिस्थिति कायम ठेवून तुम्ही या देशातील जनतेला दोन्ही प्रकारे दुखवीत आहात असें मला वाटतें असा काही त्याचा अपराध आहे असे मला वाटत नाही

माझ्या मित्रानी बगालची बरीच स्तुति केली त्याची परतफेड म्हणून मीहि आयरिश लोकाना त्याच्या बुद्धिमत्ता, कार्यक्षमता इत्यादि गुणाबद्दल धन्य-वाद देऊ शकेन तें अतिशय बुद्धिमान आणि फारच कार्यक्षम आहेत परंतु त्याच्या ब्रिटिश सरकारवरील किंवा शातता आणि सुव्यवस्थेवरील निष्ठेबद्दल त्याची मुळीच प्रसिद्धि नाही ( हास्य )

(**एक सदस्य**–हिन्दुस्थानातील आयरिश लोकाचा अपवाद सोडून )

होय, याला फक्त हिंदुस्थानच अपवाद आहे कारण येथें ते ब्रिटिशाचे पगारी नोकर आहेत हा अपवाद अगदी कसोशीनें पाळला जातो कारण काही थोर व्यक्ति सोडल्यास ब्रिटिशाच्या नोकरीत असलेल्या सर्व आयरिश लोकाना असे वाटतें की, ज्या हक्काकरिता आयर्लंडमध्यें त्याच्या देशबाधवानी लढा चालविला आहे, तें हक्क शातता आणि सुव्यवस्था राखण्यासाठी भार-तीय जनतेला नाकारणें हेच योग्य ठरेल

अध्यक्ष महाराय, माझ्या मित्राविषयी मला सहानुभूति वाटते अशा तऱ्हेचे विधान करावे लागत आहे त्याबद्दल मला खेद वाटतो परंतु त्यानी केलेल्या विलक्षण भाषणामुळेंच मी अशा अडचणीत पडलो आहे मला तें फार आवडलें परंतु त्यात अर्थ असा काहीच नव्हता आपल्या अमोघ आणि औपरोधिक

वक्तृत्वाचा त्यानी दुसऱ्या अधिक चागल्या कार्याकरता उपयोग केला असता तर फार बरे झाले असते.

सभागृहाला अधिक खोळबून टेवण्याची माझी इच्छा नाही पण मला अजून थोडे बोलावयाचे आहे श्री. सी.आर. दास याच्या भापणाचा येथे उल्लेख केला गेला. त्याच्या भापणातील त्या भागाकडे मी माझ्या बगालमधील मित्राचे लक्ष वेधू इच्छितो. माझ्या आठवणीप्रमाणे, बगालमध्ये क्रातिकारक चळवळ चालू असून ज्याचा तिच्याशी सबध आहे असे आपल्याला वाटले त्याची मनोवृत्ती बदलण्याचा आपण प्रयत्न केला ही गोष्ट श्री. दास यानी मान्य केली आहे, यात सशय नाही. परतु १८१८ च्या तिसऱ्या विनियमाखाली ज्याना अटक करण्यात आली त्याच्यापैकी कुणाचाही क्रातिकारक चळवळीशी सबध होता हे त्यानी कधीही मान्य केले नव्हते.

( जे. टी. डोनोव्हॅन-बगाल विधान परिपदेच्या कामकाजासबधीच्या ज्या भागाचा मी उल्लेख केला तो सन्माननीय सभासद बघतील काय ? )

महाशय, मी तो भाग वाचलेला नाही सभासदानी तो भाग वाचून त्याचा विचार करावा अशी मी त्याना विनती करतो पण श्री. सी. आर. दास यानी अशा तऱ्हेचे विधान केले असावे यावर माझा कधीही विश्वास बसणार नाही बगालमध्ये क्रातिकारक चळवळ असून वटहुकुमाखाली ज्याना अटक करण्यात आली त्याच्यापैकी काही जणाचा त्या चळवळीशी सबध होता हे त्यानी कबूल केले आहे ते योग्यच आहे. याबद्दल त्याना धन्यवाद द्यावयास पाहिजेत. परतु १८१८ च्या तिसऱ्या विनियमाखाली अटक करण्यासारखे काही घडले आहे हे त्यानी कधीही मान्य केले नव्हते. याच गोष्टीचा येथे सबध पोहोचतो. आपणाला तो वटहुकूम किंवा ती चळवळ याचा विचार करावयाचा नाही, तर तिसऱ्या विनियमाचे अस्तित्व टिकविण्यासाठी कोणते समर्थन करता येईल ते पाहावयाचे आहे.

( जे टी डोनोव्हॅन —सन्माननीय सभासदाच्या माहितीसाठी मी सागू इच्छितो की, ज्यावेळी श्री दास यानी ते विधान केले त्यावेळी त्या वटहुकुमाचा प्रश्नच नव्हता तिसऱ्या विनियमाचा दोन महिने वापर करण्यात आला होता )

सन्माननीय सभासदापुढे मी सर्व विषय स्पष्टपणे माडलेला आहे तिसऱ्या विनियमाखाली ज्याना अटक करण्यात आली होती, त्याचा क्रातिकारक चळवळीशी सबध होता असे विधान श्री सी. आर. दास यानी केल्याचे माझे मित्र दाखवून देत असतील तर त्याचे बोलून होईपर्यंत थावण्यास मी तयार आहे

( जे टी डोनोव्हॅन—आज सकाळीच मी ते वाचून दाखविले )

आपण ते परत वाचून दाखवाल काय ? तसे केल्यास त्याबाबतचा निर्णय घेणे मी सभागृहावरच सोडीन माझ्या माहितीप्रमाणे त्या विधानाचा अर्थ असा होत नाही

( जे टी डोनोव्हॅन— आपण ते वाचले नाही )

## धंदेवाइक राजकारणी

तिसरा विनियम रद्द केल्यास धदेवाईक राजकारणी लोकाच्या भात्यातील बाण काढून घेतल्यासारखेच होईल असेही येथे सागण्यात आले अध्यक्ष महाशय, या देशात धदेवाईक राजकारणी लोक नाहीत पुढे कदाचित् ते निर्माण होतील पण अजून तरी ते आढळत नाहीत निदान आयर्लंड व सयुक्त सस्थानात ज्या अर्थाने धदेवाईक राजकारणी हा शब्दप्रयोग करण्यात येतो त्या अर्थाने असे लोक येथे नाहीत आयर्लंड किंवा सयुक्त सस्थाने याच्यावर टीका करण्याचा माझा उद्देश नाही परतु या बाबतीत मला बरीच माहिती आहे आणि ज्या देशात मोठ्या प्रमाणावर आयरिश लोकाची वस्ती आहे त्याच्याबद्दल असलेले माझे ज्ञान मला विसरता येत नाही परतु माझ्या माहितीप्रमाणे भारतात

धदेवाईक राजकारणी नाहीत माझे चुकत असल्यास तसे दाखवून द्यावे मी म्हणतो की, असे लोक पुढे तयार होतील आमच्यावर 'सुसंस्कृतपणाचे' संस्कार होत आहेत आणि त्या **सुसंस्कृतपणाचाही तो एक भाग असू शकेल** या सर्व गोष्टी आल्याशिवाय राहाणार नाहीतच ज्या पाश्चिमात्य संस्कृतीचा आम्ही मोठ्या अभिमानाने स्वीकार करीत आहोत त्या संस्कृतीच्या अनुषंगिक अशाच या सर्व गोष्टी आहेत कदाचित् त्या शहाणपणाच्या आहेत किंवा नाहीत याबद्दल संशय असेल १८१८ चा तिसरा विनियम रद्द केल्यामुळे जर धदेवाईक राजकारण्याच्या भात्यातील बाणच काढून घेण्यासारखे होणार असेल तर माझे मित्र तो रद्दच का करत नाहीत ? तो विनियम रद्द करून अशा प्रकारचे विधान करण्याला त्या लोकाना जागाच राहिली नाही तर त्यामुळे सरकारचा मोठाच कार्यभाग साधेल मग असे लोक आपला वेळ अधिक फायदेशीर कार्याकडे खर्च करतील आणि त्यामुळे कदाचित् सरकारचा आणि राष्ट्राचाही फायदा होईल

शेवटी अध्यक्ष महाशय, मला सरकारला एक विनंती करावयाची आहे, माझ्या विनंतीचा काही परिणाम होण्याची शक्यता आहे असे वाटत नसूनही मी विनवू इच्छितो की, ज्या ज्या वेळी या देशातील शांततेला धोका निर्माण होईल त्या त्या वेळी विधान मडळाच्या यत्रणेचा उपयोग त्यानी अशा तऱ्हेचा कायदा करण्याकरता करून घ्यावा हा विनियम त्यानी सतत अस्तित्वात का ठेवावा आणि खुद्द त्या विनियमात विचारही न केलेल्या गोष्टीकरता त्याचा उपयोग का करावा ?

## अशांतता आणि दडपशाहीचे दुष्टचक्र

अध्यक्ष महाशय, आतापर्यंत मी मुख्यत बगालमधून हद्दपार केलेल्या लोकासंबधी बोलत होतो दुसरे असेच लोक असल्यामुळे माझ्याबद्दल मी परत सांगत नाही परंतु या प्रकरणातील दुसऱ्या एका बाजूकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो ज्याना तुम्ही अटक करता त्याच्या बाबतीत कदाचित् फारसे नुकसान होत

नसेल नि मशय तुम्ही त्याचे सुख हिरावून घेता, आपले आयुष्यातील कर्तव्य बजावण्यापासून तुम्ही त्याना परावृत्त करता आणि त्याना दुखवता परतु त्या-बरोबरच त्याचा नावलौकिक होतो ते वीर ठरल्यामुळे तुमच्या हितालाच बाधा येते आणि सरकारच्या नावाला कमीपणा येतो अशा तऱ्हेने शाततेच वातावरण अधिकच बिघडते तुम्हाला कदाचित् हे पटणार नाही परतु अशा तऱ्हेच्या उपाययोजनेमुळे तुम्ही अशातता आणि दडपशाही अशा दुष्ट चक्रात सतत गुरफटले जाता असे कायदे नष्ट करा जुलमी कायदे रद्द करा आणि मग फिरुन त्याची आवश्यकता वाटते काय ते पहा ? आणिबाणीच्या परि-स्थितीत तसे कायदे करण्याचा अधिकार तुम्हाला नेहमीच असतो तो तुमच्या-कडून कुणी हिरावून घेत नाही तुम्ही असे सिद्ध केले आहे काय की तुम्ही जर या लोकाना अटक केली नसती तर सर्व देशभर रक्ताचे पूर वाहिले असते आणि तुम्हाला या देशाला मुकावे लागले असते ! येथून पुढे कधीही जर तुम्हाला तशी गरज भासली तर शाततारक्षणासाठी तात्पुरत्या स्वरुपाचा अशा तऱ्हेचा कायदा तुम्हाला करता येईल त्याकरता लागणारी यत्रणा तुमच्या हाताशी सिद्ध आहेच म्हणून निदान काही काल तरी तो विनियम कायद्यातून काढून टाका तुमच्यामध्ये थोडीतरी न्यायबुद्धी शिल्लक आहे, तुम्ही नि पक्षपाती आहात, या देशावर जोपर्यंत तुम्हाला राज्य करावयाचे आहे तोपर्यंत ( एका सदस्यानी म्हटल्याप्रमाणे येथून शेवटच्या गृह सदस्यानी चुबगवाळे वाधी-पर्यंत ) तें ब्रिटिश परपरेला शोभण्यासारखे करण्याचा तुम्ही प्रयत्न करीत आहात, असा विश्वास लोकाना वाटू द्या अध्यक्ष महाशय, या ठरावाला मी पाठिबा देत आहे

नसेल नि सशय तुम्ही त्याचे सुख हिरावून घेता, आपले आयुष्यातील वर्तव्य बजावण्यापासून तुम्ही त्याना परावृत्त करता आणि त्याना दुखवता परतु त्या-बरोबरच त्याचा नावलौकिक होतो ते वीर ठरल्यामुळे तुमच्या हितालाच बाधा येते आणि सरकारच्या नावाला कमीपणा येतो अशा तऱ्हेने शाततेचे वातावरण अधिकच बिघडते तुम्हाला कदाचित् हे पटणार नाही परतु अशा तऱ्हेच्या उपाययोजनेमुळे तुम्ही अशातता आणि दडपशाही अशा दुष्ट चक्रात सतत गुरफटले जाता असे कायदे नष्ट करा जुलमी कायदे रद्द करा आणि मग फिरून त्याची आवश्यकता वाटते काय ते पहा ? आणिबाणीच्या परि-स्थितीत तसे कायदे करण्याचा अधिकार तुम्हाला नेहमीच असतो तो तुमच्या-कडून कुणी हिरावून घेत नाही तुम्ही असे सिद्ध केले आहे काय की तुम्ही जर या लोकाना अटक केली नसती तर सर्व देशभर रक्ताचे पूर वाहिले असते आणि तुम्हाला या देशाला मुकावे लागले असते! येथून पुढे कधीही जर तुम्हाला तशी गरज भासली तर शाततारक्षणासाठी तात्पुरत्या स्वरूपाचा अशा तऱ्हेचा कायदा तुम्हाला करता येईल त्याकरता लागणारी यत्रणा तुमच्या हाताशी सिद्ध आहेच म्हणून निदान काही काल तरी तो विनियम कायद्यातून गाळून टाका तुमच्यामध्ये थोडीतरी न्यायबुद्धी शिल्लक आहे, तुम्ही नि पक्षपाती आहात, या देशावर जोपर्यंत तुम्हाला राज्य करावयाचे आहे तोपर्यंत ( एका सदस्यानी म्हटल्याप्रमाणे येथून शेवटच्या गृह सदस्यानी चुबगबाळे बाधी-पर्यंत ) ते ब्रिटिश परपरेला शोभण्यासारखे करण्याचा तुम्ही प्रयत्न करीत आहात, असा विश्वास लोकाना वाटू द्या अध्यक्ष महाशय, या ठरावाला मी पाठिबा देत आहे

[ सन्माननीय सदस्य श्री. वराहगिरी वेंकट जोगिया यानी केंद्रीय विधानसभेत पुढील ठराव दिनांक ३ फेब्रुवारी १९२७ रोजी मांडला :

"ही विधान सभा गव्हर्नर जनरल यांना अशी शिफारस करीत आहे की, (अ) बंगालचा १८१८ चा तिसरा विनियम ( Regulation ) आणि हिंदुस्थानांतील इतर प्रातांत चालू असलेले तसेच विनियम रद्द करण्यात यावेत, तसेच सर्व राजकीय स्थानबद्धांची तावडतोब सुटका करून त्यांना न्याय देण्यांत यावा किंवा निदान त्यांना आपला निरपराधीपणा आणि त्यांच्यावर कांही आरोप करण्यात आले असल्यास त्यांचा फोलपणा सिद्ध करण्याची संधि देण्यांत यावी, आणि (ब) सध्या तुरुंगांत असलेल्या सर्व राजकीय कैद्यांना सार्वत्रिक माफी देण्यात यावी."

या ठरावाला पं. मोतीलाल नेहरू यानी खालीप्रमाणे दुरुस्ती सुचवून तिच्या समर्थनार्थ जोरदार भाषण केले :

" ही विधानसभा गव्हर्नर जनरल यांना अशी शिफारस करत आहे की, जुन्या विनियमांखाली आणि १९२५ च्या बंगालच्या फौजदारी कायद्याची दुरुस्ती करणाऱ्या कायद्याखाली (Bengal Criminal Law Amendment Act ) स्थानबद्ध असणाऱ्या सर्व कैद्यांची तावडतोब सुटका करण्यांत यावी किंवा त्यांची चौकशी व्हावी."

या दुरुस्ती ठरावाला **पं. हृदयनाथ कुंझरू, पं. मदन मोहन मालवीय, सर श्रीनिवास अय्यंगार, लाला लजपतराय** आदींनी जोरदार पाठिंबा दिला या ठरावाला पाठिंबा देताना लालाजींनी केलेल्या भाषणात उपरोधाने आणि उघडपणे सरकारच्या धोरणावर टीका केली आहे. पण ती करीत असतानाही त्यांनी संसदीय शिष्टाचाराचे अतिक्रमण कधीही केले नाही.

५० विरुद्ध ६३ मतांनी हा ठराव संमत झाला. ]

अध्यक्ष महाशय, सत्य परिस्थिती अशी आहे की, एका बाजूला भारत सरकार आणि या देशात राहाणारा किंवा व्यापार करणारा ब्रिटिश समाज आणि दुसऱ्या बाजूला या देशातील जनता याच्यामध्ये या बाबतीत पूर्णपणे परस्पर विरोधी अशी मतें आहेत. या प्रश्नावर त्या त्या पक्षातर्गत मात्र पूर्णपणे एकमत आहे. बंगालमधील प्रतिष्ठित नागरिकाना चौकशीशिवाय तुरुंगात ठेवणेच योग्य आहे असे सरकारला वाटते. उलट, आपल्या मूलभूत हक्कावर हे अतिक्रमण आहे आणि हे धोरण बदलण्याकरता शक्य ते सर्व प्रयत्न केले पाहिजेत असे भारतीय जनतेला वाटते ( होय, होय, असा आवाज )

## सर्व देश विरुद्ध ब्रिटिश सरकार

या विषयावर गेल्या विधान सभेत मागोपाग चर्चा झाली आणि आता त्या संबंधी बोलण्यासारखे काही उरले नाही, असे माझ्या पूर्वीच्या वक्त्यानी सांगितले आहे माननीय गृह सदस्यानी आपल्या पूर्वीच्या भाषणाचीच शब्दश द्विरुक्ति केली त्यानी नवीन अशी कोणतीहि माहिती आम्हाला पुरवली नाही. म्हणून लांब भाषण करून मीही सभागृहाचा वेळ घेणार नाही. परतु मला एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे आणि ती अशी की, या प्रश्नावर सर्व देशाचे एकमत आहे ही होय देशातील निरनिराळया पक्षाचीहि या बाबतीत मतभिन्नता

नाही ( एक आवाज—आहे ) होय **या देशाचा ज्यानीं बेकायदेशीरपणे ताबा घेतला आहे पण जे स्वत ला या देशाच्या स्वातंत्र्याचे रक्षक म्हणवून घेतात त्याचे या बाबतीत निराळे मत आहे.** तसा मतभेद आहेच ज्याचा भारतावर ताबा आहे आणि ज्याना तसे ताब्यात राहावयाचे नाही त्या दोघात मतभेद नक्कीच आहे देशाबाहेरून आलेल्या सत्ताधारी वर्गाच्या आणि भारतीय जनतेच्या विचारसरणीत भिन्नता असणारच, असे परकीय लोक्च आमच्या समोरच्या बाजूस बसले असून त्याच्या बाजूनेच तो आवाज आला स्पष्ट बोलावयाचे तर स्वत ला "स्वातंत्र्याचे रक्षक " म्हणवून घेणाऱ्या आमच्या समोरील सदस्याच्या तोंडी अशी भाषा शोभत नाही स्वातंत्र्याचे रक्षक ! वाहवा ! ज्या लोकानी एखाद्या देशाचा शस्त्रबळावर ताबा घेतला आहे, ज्याचे स्वत च्या हितरक्षणासाठी ते शोषण करीत असतात आणि जेथील जनतेला जे तुरुंगाच्या कोठड्यात चौकशीशिवाय बद करून ठेवतात त्यानी स्वत ला स्वातंत्र्याचे रक्षक म्हणवून घेणे केवळ हास्यास्पद आहे ते स्वत ला स्वातंत्र्याचे रक्षक म्हणवून घेतात आणि माझ्या अगोदर जे बोलले त्या सद्-गृहस्थाप्रमाणेच देशात गोंधळ माजू नये म्हणून अशी उपाययोजना केली पाहिजे असे सागतात वास्तविक १८१८ चा तिसरा विनियम आणि तसेच दुसरे कायदे याचे अस्तित्व आणि सरकारने अशा कायद्याखाली वारवार केलेली उपाययोजना आणि तिचे केलेले समर्थन या गोष्टी म्हणजेच या देशात असलेल्या गोंधळाबद्दलचा सभाव्य पुरावाच आहे कायद्याच्या नावाखाली घातलेला गोंधळ अशा कायद्याचे अस्तित्व आणि त्यानुसार सरकार करीत असलेली उपाययोजना या गोष्टी म्हणजे इतर सुसंस्कृत देशात ज्या तत्वावर राज्यकारभार चालतो त्या तत्वाप्रमाणे तो येथे चालत नाही याच गोष्टीचा माझ्या मते सभाव्य पुरावा आहे एका बाजूला सरकार आणि दुसऱ्या बाजूला सर्व देश याच्यात मतभेद आहे हे मी मान्य करतो ही गोष्ट नाकारता येणार नाही आणि त्यातून सुटकाही नाही आम्हाला स्वातंत्र्य हवे आहे आणि शक्य

तितक्या जास्त कालपर्यंत ते आम्हाला मिळू नये असा सरकारचा प्रयत्न आहे असा हा लढा आहे.

अशा तऱ्हेचा हा लढा असल्यामुळे प्रत्येक अधिवेशनात आम्ही असा "देखावा" का करतो असा प्रश्न विचारला गेला. एक सन्माननीय सदस्य म्हणाले की, हा एक "खेळ" आहे. त्या माननीय मित्राना आणि सभागृहातील इतराना प्रत्येक अधिवेशनात आम्ही हा कार्यक्रम परत परत का ठेवतो हे मला सागावयाचे आहे. प्रथम मला हे सांगितले पाहिजे की, आम्हाला न्याय मिळेपर्यंत आणि आमची गाऱ्हाणी दूर होईपर्यंत वर्षानुवर्षे हा "खेळ" किंवा "देखावा" चालू राहाणारच. मग विरोधी पक्षीयानी कितीही दमदाटी केली किंवा उपरोधाचा उपयोग केला तरी आमचे कर्तव्य करण्यापासून आम्ही मागे हटणार नाही. आमच्या जनतेच्या बाबतीत आमचे ते प्राथमिक कर्तव्य आहे आणि या प्रश्नाकडे बघण्याचा आमचा दृष्टिकोण मी अगदी स्पष्टपणे माननीय सभासदापुढे ठेवीत आहे.

## सरकारचा मार्ग योग्य नाही

त्या बाजूचे लोक आमचे म्हणणे मान्य करतील अशी माझी अपेक्षा नाही. गेल्या अधिवेशनात आणि त्यापूर्वीच्याही अधिवेशनात असे ठराव समत करण्यात आले आहेत. सरकार त्याना काडीचीहि किमत देत नाही, आणि माझ्या अपेक्षेप्रमाणे मोठ्या बहुसख्येने जरी आजचा ठराव समत करण्यात आला तरी सरकार तो परत कचऱ्याच्या टोपलीत टाकून देईल मग ही गोष्ट आम्ही पुनः पुन. का माडतो असे कोणी विचारल्यास ते योग्यच आहे या देशावर सुसस्कृत सरकार राज्य करीत आहे आणि येथील जनतेची त्याला मान्यता आहे या सरकारच्या दाव्यातील पोकळपणा आम्हाला उघड करावयाचा आहे हेच याचे कारण होय कायदा आणि सुव्यवस्था याच्या नावाखाली ज्या ज्या उपाय-

योजना सरकारकडून करण्यात येतात, त्याना येथील जनतेचा पाठिंबा नाही हेंच आम्हाला दाखवून द्यावयाचे आहे या देशात कायदा आणि सुव्यवस्था राखण्याची जबाबदारी फक्त सरकारवरच आहे हे मला मान्य नाही जर या देशाचा कारभार सरळ रीतीने चालला असता तर कायदा आणि सुव्यवस्था राखण्याच्या कामी सरकारपेक्षाही येथील लोकानी अधिक लक्ष घातले असते कारण त्याच्या सुरक्षिततेच्या आणि मालमत्तेचे रक्षण करण्याच्या दृष्टीने कायदा आणि सुव्यवस्था राखणेच त्याच्या हिताचे ठरले असते पण सद्य परि-स्थितीत परस्पराच्या हितसबधात सघर्ष आहे आमचे चुकते आहे असे सर-कारला वाटते तर सरकारचेच चुकते असे आमचे मत आहे कायदा आणि सुव्यवस्था याचे पालन करण्याशी आमच्यापेक्षा त्याचा जास्त सबध आहे असे सरकारला वाटते वस्तुस्थितीबद्दल गृह सदस्यानी एक लाबलचक यादी दिली आम्हाला जर परवानगी देण्यात आली तर त्याच्या बाजूने केलेल्या जुलमाची त्याच्यापेक्षाही मोठी यादी आम्ही देऊ शकू

( **सर अलेक्झाडर मुद्दिमन्**— सन्माननीय सभासद ती यादी देतील काय ? )

अशा याद्या आम्ही वर्षानुवर्षे देत आलो आहोत त्यानी मोठे मोठे ग्रथ भरले आहेत ( एक स्वराजिस्ट सभासद– आणि आता हे ) आणि अशा कितीतरी गोष्टी जवळ जवळ रोज घडत आहेत ( स्वराजिस्ट सभासद– मोपल्याच्या बाबतीत काय घडले ? जालियानवाला बागेतील कत्तलीबद्दल काय ? ) खरी परीस्थिति अशी आहे की, या गोष्टीकडे बघण्याच्या आपल्या दृष्टिकोणात फरक आहे आम्ही जे काही करत आहोत ते आमच्या देशाच्या दृष्टीने हिताचे आहे या बाबतीत दुसऱ्या बाजूचे म्हणणे आम्हाला मान्य करता येणार नाही

# अयोग्य मार्ग

आम्ही सरकारला विचारू इच्छितो की, आमचे सहकार्य मिळविण्याचा हाच मार्ग आहे काय? भारत सरकार या देशावर तेथील लोकांच्या हिताच्या दृष्टीने कारभार करीत असून ते त्यांचे मित्र आहे हे सरकार याच मार्गाने आम्हाला सांगणार आहे काय? हा मार्ग योग्य नाही. जगातील इतर देशात काय चालले आहे ते आपण पाहू या. या देशात क्रांतिकारकांचे कट आहेत हे मी गृहित धरतो. ते तसे सर्व देशात होत आले आहेतच, आणि या जगाच्या पाठीवरील कितीही सुसंस्कृत देश असला तरी त्या ठिकाणी कटाचे अस्तित्व नाही असे कोणी-हि मला दाखवून द्यावे असे मी आव्हान करतो. युद्धकाल किंवा अतिशय मोठ्या प्रमाणावर ज्यावेळी सार्वजनिक शांततेला धोका निर्माण झाला असेल असा काल सोडल्यास इतर कोणत्याही वेळी कोणताही देश किंवा कोणतेहि सरकार अशा तऱ्हेचा कायदा अमलात आणण्याचे धाडस करणार नाही. त्या वेळी अशा तऱ्हेचा कायदा चालू ठेवणे किंवा अशी उपाययोजना करणे काही अंशी समर्थ-नीय ठरेल हे आम्ही समजू शकतो. परंतु शांतता कालात अशी उपाययोजना कोणत्याही सुसंस्कृत देशात कोणी केली होती काय? क्लु क्लक्स क्लॅन किंवा आय. डब्ल्यू. डब्ल्यू. या संयुक्त संस्थानातील चळवळी आणि त्या करणाऱ्या-कडून लोकांना देण्यात येणाऱ्या फाशीसंबंधी माझ्या सन्माननीय मित्रांनी ऐकले नाही काय? आणि संयुक्त संस्थानात विविध प्रकारच्या लोकांचा भरणा असूनही तेथे अशा प्रकारचा कायदा करून त्याखाली लोकांना तुरुंगात टाक-ण्याची उपाययोजना करण्याचा कधीही प्रयत्न केला जात नाही. कोणत्याही देशाचा राज्यकारभार त्या ठिकाणचे जे सामान्य कायदे असतील त्यांना अनु-सरून देशाच्या हिताच्या दृष्टीनेच केला पाहिजे. अशा गोष्टी प्रत्येक देशात घडणारच. दुसऱ्या देशातहि त्या घडतातच. परंतु ज्या देशांना स्वराज्याचे वर-दान मिळाले आहे, त्या ठिकाणी अशा गोष्टी घडल्यास त्याच्याकडे निराळ्या

दृष्टिकोणातून पाहिले जाते त्याच्या बाबतीत सहिष्णुता दाखवावी लागते आणि जे सामान्य कायदे प्रचलित असतील त्याच्या आधारे त्याचा विचार करावा लागतो परंतु परकीयाच्या सत्तेखाली असणाऱ्या देशात अशा गोष्टी घडतात किंवा घडल्याचा संशय घेतला जातो तेव्हा त्याच्याकडे निराळ्या दृष्टिकोणातून बघण्यात येते या गोष्टी करण्यापासून तुम्हाला परावृत्त करण्याचे सामर्थ्य आमच्यात नाही अशी तुमची खात्री असल्यामुळे तुम्ही असे जुलूम करता हे तुम्ही मान्य का करत नाही? तुम्ही आपल्या कृतीने जरी तसे दाखवीत असला तरी तसे उघड सांगण्याची तुमची इच्छा नाही तुमच्या पाठीशी ब्रिटिश साम्राज्याची सर्व साधनसामुग्री आहे तर आम्ही अगदी पुरुषत्वहीन बनलो आहोत तेव्हा दरवर्षी आम्ही हे ठराव संमत करण्यात भारतीय विधान मंडळाची पूर्ण असमर्थताच आम्ही जगाला दाखवून देत असतो मर्यादित मतदानाच्या हक्काच्या जोरावर निवडून आलेल्या बहुसंख्य सभासदांचे हे विधान मंडळ जगाला टाहो फोडून सांगत आहे की, या देशातील राज्यकारभार योग्य प्रकारे चालत नाही आणि येथे येण्यात आमचा तोच हेतु आहे आम्हाला कोणतेही साहाय्य नको आमची मते तुम्ही मान्य कराल अशीहि आमची अपेक्षा नाही. महिनोन्‌महिने, वर्षानुवर्षे या सभागृहात आम्ही हेच सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत आहोत की, येथील कारभार प्रजेच्या संमतीनेच चाललेला आहे आणि हे सरकार सुसंस्कृत आहे असा जो दावा तुम्ही करीत आहात तो पूर्णपणे दांभिकपणाचा आणि असत्य आहे ही अगदी साधी गोष्ट आहे आता युद्ध सुरू नाही, सामाजिक शांततेचाही भंग झालेला नाही, किंवा कोणत्याहि तऱ्हेची अशांतता नाही सध्या शांततेचा काल आहे हे तुम्हीहि कबूल करता, तुम्हाला हेही मान्य आहे की, भोवतालचे वातावरण शांत आहे मग तुमच्या स्वतःच्या विधानाप्रमाणेच जे केवळ आणीबाणीच्या कालावरताच असतात, अशा अन्याय्य कायद्याची अंमलबजावणी तुम्ही का चालू ठेवता ? शांतता प्रस्थापित झाली

आहे हे तुम्हाला पटलेले नाही आणि ते तुम्हाला कधीच पटणार नाही असे मला वाटते. कारण अशा गोष्टी घडत राहाणारच.

## दुष्ट चक्र

आपण एका दुष्ट चक्रात सापडलो आहोत. जेव्हा धातपाती कृत्ये घडतात तेव्हा हा कायदा तुम्ही अमलात आणता, आणि जेव्हा अशी कृत्ये घडत नाहीत तेव्हा सागता की, वटहुकूम लागू केला आणि त्यामुळे शांतता निर्माण झाली. ( हास्य ) अशा तऱ्हेच्या उपाययोजनेमुळे कदाचित् अधिक घातपाती कृत्ये होतील व्यक्तिस्वातंत्र्यावर तुम्ही कितीही बंधने घातलीत तरीही भारता-सारख्या विशाल देशातून जातीचे पूर्ण उच्चाटन तुम्हाला ती कितीही आवडत नसली तरीही करता येणार नाही भारत हा एक उपखंड आहे हे तुम्हीच सागता. मग अशा घातपाती कृत्यांचे एकूण लोकसंख्येशी काय प्रमाण आहे ? संयुक्त संस्थाने, फ्रान्स, जर्मनी, केव्हा केव्हा ग्रेट ब्रिटन येथील गुन्हेगारीच्या आकडे-वारीशी तुलना केली तर येथील गुन्हेगारीचे प्रमाण दुर्लक्ष करण्याइतके अल्प आहे असे लक्षात येईल म्हणून विरोधी पक्षाने सांगितलेल्या गोष्टी अचूक आहेत असे गृहित धरले तरीही १८१८ चा तिसरा विनियम लागू करण्याचे किंवा या लोकांना तुरुंगात ठेवण्याचे कोणतेही कारण घडले आहे असे मला वाटत नाही.

## मूलभूत हक्क

आहे, अशा व्यक्तीला कोणत्याही सुखसोयी मिळाल्या तरी त्या त्याला रुचत नाहीत हे त्याच्या लक्षात येईल. तुम्ही त्याना सर्व सुखसोयी पुरवता हे मला क्षणभरही मान्य नाही पण त्या जरी तुम्ही त्याना पुरविल्या तरी त्याना त्याचे काहींच सुख नाही परंतु एक क्षणभर तुम्ही त्याना जीवनाला आवश्यक अशा सर्व सुखसोयी पुरविता हे जरी मान्य केले तरी आयुष्यातील चैनींपेक्षा स्वातंत्र्याला जे अधिक महत्व देतात अशा भावनाप्रधान स्वभावाच्या लोकांना त्याची काय किंमत वाटणार ? ज्याच्यावरील आरोप सिद्ध झाला आहे आणि ज्याना तुरुंगात टाकण्यात आले आहे अशा व्यक्तींना त्रास सहन करावा लागला तर चालेल, परंतु ज्याच्या बाबतीत चौकशी केली गेली नाही आणि ज्याला आपली बाजू मांडण्याची संधी देण्यात आलेली नाही, ज्याच्यावर कोणताही आरोप दाखल केला नाही अशा माणसाच्या बाबतीत हे योग्य ठरणार नाही जर तो भावनाप्रधान वृत्तीचा असेल तर रोगग्रस्त झाल्याशिवाय राहाणार नाही आपल्या दास्यात असलेल्या लोकावर परकीय सरकारने केलेला हा एक जुलमाचाच प्रकार आहे असे मला म्हणावयाचे आहे ही वस्तुस्थिति आहे या सर्व गोष्टीकडे बघण्याचा आपला दृष्टिकोण असा असला पाहिजे आमची सर्व भाषणे आणि मुद्दे ऐकूनहि तुम्हाला सत्य पटणार नाही किंवा त्या उलट तुमच्या मुद्याचाही आमच्यावर प्रभाव पडणार नाही आमच्या बाबतीत मूलभूत हक्काचा हा प्रश्न आहे हे कायदे अस्तित्वात ठेवण्याचा तुम्हाला हक्क नाही अशी आमची खात्री आहे तुमच्या साम्राज्याचे आणि आमच्यावरील वर्चस्वाचे केवळ तुमच्या समजुतीप्रमाणे रक्षण करण्याकरताच तुम्ही ते चालू ठेवले आहेत.

ज्याच्या बाबतीत हा विनियम लागू करण्यात आला आहे ते लोक तुमच्या या देशातील राज्य कारभारात अडथळे आणीत आहेत म्हणून त्याना तुरुंगात टाकलेच पाहिजे अशी तुमची खात्री झाली आहे जोवेळपर्यंत या कायदे मंडळात तुम्हाला असे करण्यापासून थांबविण्याची

ताकद आमच्यात आली नाही तोपर्यंत हे असेच चालत राहणार होय. हे प्रश्न येथे मांडताना ते तुम्ही मान्य कराल आणि या सभागृहात संमत झालेल्या ठरावाप्रमाणे उपाययोजना कराल अशी माझ्या मित्राची अपेक्षा नव्हतीच परंतु या देशाचा राज्यकारभार करताना येथील लोकांच्या योग्यत्याही न ह्येच्या सहकार्याची तुमची मन पूर्वक अपेक्षा असल्यास ही भावना येथे किती सार्वत्रिक झाली आहे आणि तिला मान देऊन तिचा विचार करणे तुमच्या दृष्टीने किती आवश्यक आहे हे तुम्हाला दाखविण्याकरताच असे प्रश्न येथे मांडण्यात येतात. अशा सहकार्याची तुम्हास जरूर नाही असा तुमचा दावा असल्यास तुमचे चाललेले वर्तन योग्यच आहे. मी मघाशीच सांगितल्याप्रमाणे आमच्यामध्ये काहीच सामर्थ्य उरलेले नाही, आम्ही पुरुषत्वहीन बनलो आहोत, हे दाखविण्याकरिताच हे ठराव मांडले जातात. आमची एक बाबमची तक्रार असून ती मिटल्याशिवाय या देशात राजकीय शांतता नांदणार नाही हेच दाखविण्याचा आमचा हेतु आहे. म्हणून विरुद्ध पक्षाच्या लोकांनी क्षणभर ते आमच्याच परिस्थितीत आहेत अशी कल्पना करावी.

## केवळ भावना नाही

हा केवळ भावनेचा प्रश्न आहे असे एका सन्माननीय सदस्याने सुचविले. जरी हा भावनेचा प्रश्न असला तरी पूर्णपणे तो तसा नाही. सर्व जगावर भावनेचा प्रभाव पडतो. भौतिक फायदे आणि उपजीविकेच्या

करतो. हा भावनेचा उद्रेक आहे काय ? हीच जर केवळ भावना असेल तर सर्व जग विशेषत ब्रिटिश बेटें त्याच भावनेने प्रभावित झालेली आहेत यापूर्वीच्या पाठीवर इग्रज लोकापेक्षा आपल्या स्वातत्र्याला अधिक किमत देणारे कोणीही लोक नमतील आम्ही निर्माण केलेला प्रश्न स्वातत्र्याचा, नि पक्षपाती चौकशीचा आहे एका इग्रज गृहस्थाने त्याचा भावनेचा उद्रेक असा उल्लेख केल्याचे ऐकून मला फार आश्चर्य वाटले हा आमच्या मूलभूत हक्काचा प्रश्न आहे तो भावनेचा प्रश्न नाही म्हणूनच अधिकारी पक्षाच्या सदस्यानी थोडा वेळ ते आमच्याच ठिकाणी आहेत अशी कल्पना करावी आणि मग त्याना काय वाटले असते याचा विचार करावा अशी मी त्याना विनती करतो त्याची सर्व भाषणे, त्याचे वाड्मय आणि इतिहासात त्यानी केलेल्या गोष्टी यावरुन त्याची भावना काय झाली असती हे दिसून येते त्याना आमच्या सारखी वागणूक देण्यात आली तर कोणीही इग्रज माणूस एक क्षणही ती सहन करणार नाही स्वाभिमान असलेल्या कोणत्याहि समाजाला ते कधीही सहन होणार नाही आम्ही अत्यत असहाय्य आणि पुरुषत्वहीन बनल्यामुळे आम्हाला ते सहन करावे लागले आणि त्यामुळेच तुम्ही त्याचे समर्थन करता आणि आमच्या रक्षणाकरता त्याची आवश्यकता आहे असे सागता आमचे सरक्षण ! कृपा करून तुमची उपाययोजना कायदेशीर आहे असे म्हणून तिचे समर्थन करू नका तात्रिक दृष्टचा जरी ती कायदेशीर असली तरी तिची आवश्यकता नाही आणि ती तुमच्या हिताची नाही तुमच्या विरुद्ध सतापाचा प्रचड साठा तुम्ही निर्माण करीत आहात आणि त्यामुळे हे दुष्ट चक्र सतत चालू राहून समेट होण्याची सधि दूर जात आहे हे गाऱ्हाणे दूर झाल्याशिवाय तुमच्यामध्ये आणि येथील लोकात समझोता होण्याची मुळीच शक्यता नाही

म्हणून कोणत्याही तऱ्हेचा द्वेषभाव मनात न ठेवता, तुम्हाला केवळ विरोध करण्याकरता नव्हे, पण तुमची भूमिका समजून घेण्याच्या माझ्या आणि

माझ्या मित्राच्या हेतूच्या पोटी मी तुम्हाला अशी विनती करतो की, आमच्या भावनेचा तुम्ही आदर करा आणि ज्या प्रकारे तुम्ही आम्हाला वागणूक देत आहोत तशी देऊ नका

## भारताचे मित्र कोण ?

भारताचे मित्र म्हणून सांगण्याचा हक्क केवळ आम्हालाच आहे काय असा प्रश्न एका सन्माननीय सभासदानी विचारला ते म्हणाले की, भारताचे मित्र फक्त आमच्याच बाजूला आहेत असे नाही परंतु मी त्याना असे बजावून सांगतो की, भारताचे मित्र फक्त याच बाजूला आहेत ज्याप्रमाणे तुम्ही ग्रेट ब्रिटनचे आमच्यापेक्षा अधिक प्रमाणात मित्र आहात त्याप्रमाणे आम्हीहि काही झाले तरी भारताचे समोरील सभासदांपेक्षा अधिक प्रमाणात मित्र आहोत तुम्ही तुमच्या देशाशी आणि लोकांशी पूर्णपणे एकनिष्ठ असून थोर देशभक्त आहात तुमच्या रक्तातील प्रत्येक बिंदू ब्रिटिश आहे तसेच आम्ही या बाजूचे लोकही त्याच सन्मानाचा हक्क सांगत आहोत त्या बाजूच्या कोणाहीपेक्षा आम्ही भारताचे अधिक प्रमाणात मित्र आहोत आणि आम्ही जर तसे नसतो तर मी सर्वप्रथम जाऊन यमुनेत जलसमाधी घेतली असती माझ्यापेक्षा किंवा या बाजूला बसलेल्या दुसऱ्या कोणाहीपेक्षा या देशात आलेल्या कोणत्याही इंग्रज व्यक्तीचे भारतावर अधिकप्रेम असू शकणार नाही, यात तिळमात्रही संशय नाही या राज्यपद्धतीच्या मागचे सरकारचे धोरण मी समजू शकतो म्हणून आम्ही असमंजस असून सारवासारवीने आमचे समाधान होईल असे समजू नका आम्ही प्रौढ आहोत ही तत्त्वे समजण्यास तुम्हीच आम्हाला मदत केली आहे प्रत्येकाला ती तत्वे पूर्णपणे माहीत आहेत म्हणून आमच्याशी खेळ खेळू नका मुलाप्रमाणे आमची संभावना करू नका तुम्ही जे काय करत आहात ते तुमच्या साम्राज्याच्या रक्षणाकरता करत आहात असे सांगा स्पष्ट बोला कदाचित तुमचे चुकत आहे असे आम्ही म्हणू परंतु तुम्हाला त्यापासून आम्ही परावृत्त करू शकणार नाही एवढेच मला सांगावयाचे आहे

# किनारी वाहतुक भारतीय
# जहाजांकरितां राखण्यासंबंधी विधेयक

[*केंद्रीय विधान सभेत श्री. साराभाई नेमचंद हाजी यानी भारतातील किनारी* वाहतुक भारतीय जहाजाकरिता राखून ठेवण्याबद्दल एक विधेयक माडले होते. हे विधेयक *पं. मोतीलाल नेहरू, श्री. जमनादास मेहता, लाला लजपतराय,* प. मदन मोहन मालवीय, श्रे. मा श्री अणे, आदि सदस्याची एक चिकित्सा समिति नेमून तिच्याकडे चौकशीकरिता सोपविण्यात यावे अशी सूचना श्री. हाजी यानी २० सप्टेंबर १९२८ रोजी माडली.

लालाजींनीं या सूचनेला पाठिंबा देताना ब्रिटिश व्यापाराला उत्तेजन देऊन भारतीय लोकाच्या व्यापाराला निरुत्साही करण्याच्या सरकारच्या पक्षपाती धोरणावर प्रखर टीका केली आहे या भापणात भारतीय दृष्टिकोण त्यानी अत्यत अभिनिवेशाने माडला आहे]

अध्यक्ष महाशय, व्यापार सदस्यानी भापण करताना जी प्रशसनीय वृत्ति दाखविली आहे त्याबद्दल मी त्याचे अभिनदन करतो परतु त्याच्या मुद्याशी आणि त्यानी काढलेल्या निष्कर्पाशी मी सहमत होऊ शकत नाही कोणताही पक्षपाती कायदा करण्यात येऊ नये या आपल्या मुद्याला आधार म्हणून माननीय गृह सदस्यानी आणि युरोपियन गटाच्या इतर सन्माननीय सदस्यानी नेहरू *समितीनें युरोपियन व्यापाराविषयी केलेल्या अहवालातील विधानाचा उल्लेख* केला आहे माझ्या मते त्या विधानाचा त्यानी केलेला उपयोग अगदी अन्याय्य होता मी तो अहवाल तयार करणारापैकी एक होतो, असा दावा मला करता येत नसला तरी त्याला पाठिंबा देणाऱ्या प्रमुख व्यक्तींपैकी मी एक आहे असे

आतापर्यंत अनेक प्रकारे झालेले आमचे नुकसान भरून निघणार असेल तर तें अगदी समर्थनीय ठरेल

अध्यक्ष महाशय, पक्षपात करण्याचा या विधेयकाचा उद्देश नाही हे दाख-विण्यापूर्वी वसाहतीच्या सरकाराशी भारत सरकार भारतीय लोकांकरता लढा देत आहे असें जे प्रतिपादन व्यापारी सदस्यानी केलें आहे ते मला खोडून काढावयाचे आहे त्याचे हें विधान अगदी चुकीचे असून टिपण्यासारखे नाही

द्या. परंतु राजकीय सत्तेच्या जोरावर येथील कायदे मंडळावर सत्ता गाजविण्याचा हक्क अगदी असाधारण आहे. ब्रिटिशाच्या या देशावर असलेल्या सत्तेच्या बळावर तो हक्क ते मागत आहेत. परतु वसाहतीमध्ये आम्ही ही गोष्ट मागत नाही. म्हणून या दोन्ही गोष्टीत साम्य नाही

## सरकारचा पक्षपात

अध्यक्ष महाशय, सन्माननीय सदस्यानी पक्षपाती कायद्याबद्दल बोलू नये, असें मला वाटते. त्याचा कोणालाच फायदा होणार नाही प्रत्यक्ष आपणाला काय दिसत आहे ? आर्थिक, लष्करी आणि राजकीय बाबतीत सरकारची पद्धत आणि रचना म्हणजे पक्षपाती कायद्याचा सततचा पुरावाच आहे. १९१९ साली जाहीर केलेल्या सुधारणात देखील पक्षपाती कायद्याचा अंतर्भाव होता. ज्या ठिकाणी आमचे बहुमत आहे असें मानलें जातें त्या विधान सभेचेंच उदाहरण घ्या. हें विधेयक या विधान सभेंत मजूर होईल अशी आम्हाला खात्री नाही, त्याचप्रमाणें त्याचा कायद्यात अतर्भाव करता येईल असाही आम्हाला विश्वास नाही जरी या विधान सभेनें सरकारच्या मर्जीविरुद्ध हे विधेयक संमत केलें तरी पूर्णपणें त्याच्या हातातील बाहुलें असलेले कौन्सिल ऑफ स्टेट आहेच. त्याशिवाय गव्हर्नर जनरल याचा व्हेटोचा अधिकार आहेच.

हा वांशिक पक्षपात नाही काय ? हा पक्षपाती कायदा नाही काय ? त्या बाजूच्या या सद्गृहस्थानी आमच्यावर त्याच्या विरुद्ध पक्षपात केल्याचा आरोप करणें अगदी हास्यास्पद आहे. या देशातील त्याच्या सर्व उलाढाली येथील त्याचा सर्व व्यापार या गोष्टी पक्षपातावरच आधारलेल्या आहेत. रेल्वेच्या बाबतीत पक्षपात, जहाजाच्या बाबतीत पक्षपात, सर्वत्र पक्षपात, अगदी खालच्या पातळीपर्यंत हीच गोष्ट आपणाला आढळून येईल. युरोपियन लोकानी आम्ही पक्षपाती कायदा आणला अशी तक्रार करणे न पटण्यासारखें

आणि हास्यास्पद आहे अध्यक्ष महाशय, या विधेयकाबद्दल बोलावयाचे तर मी असे सांगू इच्छितो की, त्याच्याशी पक्षपाती कायदा करण्याचा किंवा वांशिक पक्षपाताचा संबंध नाही याचा एक पुरावा युरोपियन गटातील एका व्यक्तीकडूनच मिळाला आहे १७ ऑगस्ट रोजी लिहिलेल्या एका अग्रलेखात 'स्टेट्समनचे' संपादक म्हणतात

## स्टेटसमनचा पुरावा

"काल किनाऱ्यावरील व्यापार भारतीय जहाजांकरिता राखून ठेवण्याबद्दल **श्री. हाजी** यांनी मांडलेल्या विधेयकावर लिहीत असताना हे अत्यंत घातुक विधेयक आहे असे मत आम्ही मांडले होते परंतु त्याचवेळी आम्ही असेही दाखवून दिले होते की, वांशिक पक्षपात करण्याचा भारतीयांच्या हेतूचा हा पुरावा आहे असे म्हणता येणार नाही; कारण वस्तुतः इतर देशांनीही आपल्या किनाऱ्यावरील व्यापाराला अगदी १०० टक्के संरक्षण दिलेले आहे ऑस्ट्रेलियातील ब्रिटिश लोक मायदेशातून येणाऱ्या जहाजांच्या विरुद्ध पक्षपात करण्यासही मागेपुढे पहात नाहीत"

तेव्हा अध्यक्ष महाशय, जगातील मोठ्यात मोठ्या सागर किनारा असलेल्या देशांनी आपल्या देशाचा व्यापार वाढविण्यासाठी जी गोष्ट केली तीच करण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहोत प्रत्यक्ष ती गोष्ट ही करीत नाहीच कारण ती करण्याचे सामर्थ्य आमच्या हाती नाही सतराव्या शतकात इंग्लंडची स्थिति हलाखीची होती तेथे फारच बिकट आर्थिक अवस्था निर्माण झाली होती त्यांचे चलन इतक्या निकृष्ट अवस्थेला पोहोचले होते की, वॅटस् सारख्या संशोधकाचे शोध प्रत्यक्षात उतरविण्यासाठी त्यांच्याजवळ भांडवल नव्हते परंतु भारतातून त्यांना मिळालेल्या संपत्तीच्या मदतीने या गोष्टी त्यांना साध्य करता आल्या त्यांनी आपल्या उद्योगधंद्यांचे बस्तान बसविले औद्योगिक

याति देखील हिंदुस्थानात मिळविलेल्या लुटीच्या आणि मपत्तीच्या जोरावर घडून आली. आमच्यावर त्यानी मिळविलेल्या राजकीय मत्तेच्या जोरावर त्यानी आमच्या उद्योगधद्यांचा नायनाट केला, आणि त्याच राजकीय सत्तेच्या साहाय्यानें एका शतकाहून अधिक काल त्यानी आम्हाला आमच्या उद्योग-धद्यांचा विकास करण्यापासून परावृत्त केलें आहे. कापड धंद्याच्या इतिहासा-वरुन हेंच दिसून येईल. जहाज बाधणी बाबतही हेंच म्हणता येईल. म्हणून त्याच लोकानी आता पुढें येऊन आमच्या किनाऱ्यावरील वाहतुक आमच्या-करिता राखून ठेवण्याचा आम्ही प्रयत्न केला असता आमच्यावर वांशिक पक्ष-पाताचा आरोप करणें त्याना शोभत नाही. जे स्वत.ला प्रामाणिक म्हणवून घेतात, ज्यानी इतिहासाचा अभ्यास केला आहे व भारतात घडणाऱ्या घटनाची ज्याना प्रत्यक्ष माहिती आहे अशा लोकानी असें बोलणें योग्य नाही.

## कायदेशीर प्रयत्न

अध्यक्ष महाशय, हें विधेयक म्हणजे आमच्या जलवाहतुकीच्या धंद्याची घडी परत बसविण्याकरिता केलेला एक पूर्णपणें कायदेशीर प्रयत्न आहे. *आपल्या नेहमीसारख्या वक्तृत्वपूर्ण भाषणात माझे सन्माननीय मित्र* **मि. डेव्हिड ससून** यानी या विधेयकाबद्दल फारच थोडे सांगितलें. त्याच्या भाषणाचा बराच भाग गोळ्या आणि औषधें याच्याबद्दल होता. कापड धद्याचा त्यानी उल्लेख केला. परतु कापडाचा धदा आणि जलवाहतुकीचा धदा याच्यात समान स्थिति आहे असें ते प्रामाणिकपणे सागतील काय असे मी त्यांना विचारतो. जलवाह-तुकीच्या धद्याला देशाच्या आर्थिक भरभराटीत सर्वात महत्त्वाचे स्थान आहे एवढेंच नाही तर ज्यावर देशाची सुरक्षितता आणि अस्तित्व अवलबून आहे असा तो अत्यत महत्त्वाचा उद्योग आहे. ज्यावर आमच्या देशाचे अस्तित्व प्रत्यक्ष अव-लबून आहे अशा या उद्योगाचा मजबूत पाया घालण्याची आमची इच्छा आहे. कापड धंदा आणि जलवाहतुक व्यवसाय यात कोणतेही साम्य नाही. आमच्या

देऊ, परतु युरोपियन भाडवलदाराना विरोध करण्याचा या विधेयकाचा उद्देश आहे त्याला आमची हरकत आहे" असें बोलणे सर ससून यानाच योग्य दिसते परतु ब्रिटिश भाडवलदार भारतीय भाडवलदाराना मिळणारी सधि हिरावून घेण्याची इच्छा का धरतात ? अध्यक्ष महाशय, हे मोठे चमत्कारिक प्रतिपादन आहे दोन्ही प्रकारच्या भाडवलदारानी आपले हितसबध राखण्याकरता कट केला असावा अशी माझी समजूत होती, परतु भारतीय भाडवलदाराच्या आणि आपल्या हितसबधात सघर्ष होणार असें आढळून येताच ब्रिटिश भाडवलदार भारतीय भाडवलदाराचे गळे दाबून सर्व व्यवसाय आपल्या हाती ठेवतात असें प्रत्यक्ष आढळून येतें

अध्यक्ष महाशय, भारतीय किंवा ब्रिटिश अशा कोणत्याही भाडवलदाराशी माझी मैत्री नाही परतु मजूर आणि नोकर ठेवण्याबद्दलचे हे सर्व बोलणें व्यर्थ आहे कारण सद्य स्थितीत कोणत्याही भारतीय जहाजावर बोटी किंवा जहाजे चालविण्याचे शिक्षण भारतीयाना ि ण शक्य दिसत नाही भारतीय जलवाहतुक अुद्योगाचा विकास करावयाचा असेल पर त्याला भारतीय भाडवलदारानी भाडवल पुरविणें आवश्यक आहे मर्कंटाइल मरीन कमिटी समोर देण्यात आलेल्या पुराव्यावरूनही ही गोष्ट अगदी स्पष्ट झालेली आहे

ुरोपियन जहाज व्यवसायातील लोक आता चढाओढीबद्दल बोलत आहेत त्यानी आमच्या भाडवलाचे हरण केले आहे, आमचे उद्योगधदे नष्ट केले आहेत, आमच्या जलवाहतुक व्यवसायाचा विकास त्यानी आम्हाला करून दिला नाही, आणि आज ते आम्हाला सागत आहेत की, " आमच्याशी न्याय्य चढाओढ करा " तसें करणें आम्हाला कसे शक्य आहे ? म्हणून इतर देशातील सरकारानी तेथील लोकाना जशी सधी आणि अधिकार दिले आहत तसेच येथील सरकारनें आम्हाला द्यावेत असें आमचे मागणें आहे इतर देशातील सरकारानी ज्या अधिकाराचा उपयोग केला त्याच अधिकाराचा उपयोग येथील सरकारनेंही

# श्रद्धांजलि

जोपर्यंत आकाशात सूर्य तळपत राहील तोपर्यंत लालाजींसारख्या व्यक्तींना मृत्यु येणार नाही. लालाजी म्हणजे एक संस्थाच होते. प्रथमपासून देशसेवा हाच त्यांनी आपला धर्म मानला. त्यांच्या देशभक्तीमागे विशाल मानवता-वादी दृष्टिकोण होता. साऱ्या मानवजातीवर त्यांचे प्रेम होते म्हणूनच स्वदेशावरहि त्यांचे प्रेम होते. त्यांची राष्ट्रीयता ही आंतरराष्ट्रीय दृष्टिकोणातून निर्माण झाली होती

—महात्मा गांधी

लाला लजपतराय यांचें थोर दयाळू अंतःकरण, त्यांचें स्वातंत्र्यप्रेम आणि गांजलेल्या लोकांशी त्यांचें औदार्यपूर्ण वर्तन या सर्वांमुळें त्यांच्या सान्निध्यांत आध्यात्मिक स्फूर्ति मिळत असे. जरी त्यांनीं देशाकरितां फार हाल सोसले तरी त्यामुळें त्यांच्या हृदयांत कटुता निर्माण झाली नाहीं, सत्ताधाऱ्यांच्या जुलमी वृत्तीची त्याचप्रमाणें गुलामींत खितपत पडलेल्या लोकांच्या दौर्बल्याची कारण-मीमांसा समजून घेण्याइतकें त्यांचें अंतःकरण मोठें होतें.

—पेथिक लॉरेन्स

आपल्या भेदक अंतर्दृष्टीतून लालाजी व्यक्तीची तसेंच राष्ट्राची परी-क्षा करीत असत. एका दृष्टिक्षेपांत अचूक परीक्षा करणें, कठोर दृढनिश्चय, अंगि-कारलेल्या कार्याच्या सूक्ष्म बाबीही अत्यंत काळजीपूर्वक आणि विनचूकपणें पार पाडणें हे थोर मुत्सद्याला लागणारे सर्व गुण त्यांचे ठायीं होते. त्यामुळें युरोपांतील थोर राजकारणी लोकांच्या बरोबरीचें स्थान मी त्यांना देत आलों आहे. त्यांच्याइतक्या योग्यतेचा राजकारणी पुरुष युरोपांत कोणीहि नाहीं. पाश्चात्य लोक ज्या गुणांची देणगी फक्त आपणासच मिळाली आहे असें समजतात ते सर्व गुण तर त्यांचे अंगीं परिपूर्ण होतेच, पण त्याशिवाय त्यांचे अंगीं प्राचीन भारतीय ऋषिसारखी आध्यात्मिक प्रवृत्ति होती. त्याच्या-प्रमाणेंच ते अत्यंत धर्मनिष्ठ आणि अतिशय निःस्वार्थी होते.

—रोमा रोलाँ